भारत-इतिहास-संशोधक-मंडळ, स्वीय ग्रंथमाला क्र. ८४

# ऐतिहासिक संकीर्ण निबंध

## खंड ५ वा

संपादक व प्रकाशक
चिंतामण गणेश कर्वे
चिटणीस, पुणें नगर संशोधन समिति व
भा. इ. सं. मंडळ, पुणें

किंमत तीन रुपये

[ इ. स. १९५२

# निवेदन

ऐ. सं. निबंध खंड ४ था चार वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाल्यावर हा पाचवा खंड प्र होत आहे. मध्यंतरीच्या काळांत मंडळानें इतर महत्त्वाच्या गोष्टींसंबंधीं त्रै ...का अंक काढले.

या लेखसंग्रहांतील श्री. यशवंतराव फफे यांच्या लेखाकडे (१) वाचकांचें लक्ष ... वेधावेंसें वाटतें. या विद्वान् गृहस्थांनीं शिवभारताचा अत्यंत चिकित्सापूर्वक ... करून पांचसहा दिवस मंडळांत आपण सुचविलेल्या पाठभेदांसंबंधीं सांगोपांग चर्चा के... शिवभारताची मूळ पोथी न पाहतांही त्यांनीं आपल्या कुशाग्र बुद्धीच्या मदतीनें ... अनेक नवे पाठ सुचविले ते चर्चेच्या वेळीं मूळ पोथीशीं ताडून पाहण्यांत आले ... आश्चर्याची गोष्ट कीं, त्यानीं सुचविलेल्या पाठांपैकीं शेंकडा साठांच्यावर टक्के पाठ मूळ पोथीशीं तंतोतंत जमले.

प्रा. ह. बा. भिडे यांचा शाक्तपंथाचा अभ्यास प्रसिद्ध आहे. त्यांच्यासारख्या अधिकारी पुरुषानें सारांशरूपानें लिहिलेला या अंकांतील लेख (२) वाचनीय झाला आहे.

प्रा. मिराशी यांचा लेख (४) त्यांच्या विद्वत्तेस साजेसाच आहे. आजपर्यंत महाराष्ट्राचा निर्देश सातव्या शतकांतील समजला जाई तो आतां चौथ्या शतकापर्यंत मागें नेतां येतो, असें त्यांच्या लेखावरून म्हणतां येईल.

श्री. अक्षयकीर्ति व्यास व श्री. खरे यांचा लेख महत्त्वाच्या (१२)कागदपत्रांनीं भरलेला आहे. या पत्रांत संस्कृत पत्रांचा भरणा आला आहे तो विशेष अभ्यसनीय आहे. या संग्रहांतील सहा क्रमांकाचें पत्र महत्त्वाचें असून बाजीरावाची अंतरींची ऊर्मी त्यांत स्पष्ट झालेली दिसून येते. या संग्रहांतील इतर पत्रेंहि अभ्यसनीय आहेत.

डॉ. नानासाहेब सरदेसाई यांचा लेख (१३) जिंजीप्रकरणावर नवा प्रकाश खात्रीनें टाकील असा आहे. त्या प्रकरणांतील इतर मजकूर मराठी वाचकांस उपलब्ध झाल्यास तोहि पाहिजेच आहे. या अंकांतील इतर लेखहि अभ्यासकांनीं लिहिलेले असल्यानें तेहि वाचनीय झाले आहेत.

अखिल भारतीय इतिह ... यांच्या सुप्रसिद्ध व ऐतिहासिक परंपरेंत वाढले ... मध्यें भरावयाचें आहे. तरी ज्यांना शक्य होईल ... पत ( रेल्वेकडून सवलतीचीं तिकिटें इतिहास ... व आपआपल्या आवडीच्या विषयावर निबंध ... येत्या महिन्यांत अवश्य पाठविण्याचें करावें.

मंडळाच्या त्रैमासिका ... सूचना याव्या, अशी सभासदांस विनंती.

'नवभारत' पुणें ह्या ... (५२) काढून संपादकांनीं भारतांत नवेपण ... आहे.

# ऐतिहासिक संकीर्ण निबंध

## खंड ५ वा



### १ भारतीय ज्योतिषांतील लग्न या परिमाणाचें प्राग्राशीकालीन स्वरूप

( श्री. भा. रं. कुळकर्णी, बी. ए., राजवाडे संशोधनमंडळ धुळें )

+भारतीय ज्योतिषांत राशींचा उपयोग करीत नसत असा एक काळ[1] आहे. त्यानंतर त्यांचा उपयोग होऊं लागला तो सांप्रतहि सर्रास चालूं आहे. पूर्वक्षितिजावर उदित राशीला लग्न अशीहि एक संज्ञा आहे. या परिभाषेप्रमाणें एका अहोरात्रांत, पूर्व-क्षितिजावर उदित होऊन जाणाऱ्या एका संपूर्ण राशीचक्रामुळें बारा लग्नांचें एक वर्तूळ पूर्ण होतें. आज राशीनिरपेक्ष लग्न ज्योतिषांत दिलेलें नाहीं. परंतु जेव्हां भारतीय ज्योतिषांत राशींचा उपयोग केला जात नव्हता तेव्हां ही 'लग्न' संज्ञा धारण करणारें एक कालपरिमाण होतेंच. प्रश्न येवढाच कीं, तें कशा स्वरूपाचें होतें याचें विवरण प्रस्तुत टांचणांत करतों.

#### प्राग्राशीकालीं लग्न होतें काय ?

वेदांगज्योतिषांत राशी नाहींत पण लग्न[2] आहे. आणि तें त्यांत असल्याचें ज्योतिष संशोधकांस[3] मान्य आहे. परंतु एकादा दुसरा टीकाकार[4] इतक्यावरही वेदांगांत लग्न अभिप्रेत नाहीं असें म्हणण्याचें धाडस करतोच. तेव्हां वेदांगांतील पुराव्याच्या जोडीला दुसरा एक पुरावा दाखवितों.

---

+मंडळ पाक्षिक सभा ५।७०

( १ ) भारतीय ज्योतिषशास्त्राचा इतिहास श्री. शं. बा. दीक्षित

( २ ) ,,

( ३ ) ( १ ) वेदिक क्रॉनॉलाजी व वेदांगज्योतिष ( लो. बा. गं. टिळक )

( २ ) वेदांगज्योतिष—डॉ. शामशास्त्री

( ४ ) 'समीक्षक' यांतील विक्रमसंवताचें परीक्षण—ना. गो चापेकर.

**ज्योतिषकरंडक** या नांवाचा जैन श्वेतांबर पंथाचा एक ग्रंथ वलभी नगरांत इ. स. च्या ६ व्या शतकांत झालेल्या विद्वानांच्या परिषदेनें तयार[५] केला. तो तयार करण्याचें कारण त्यांच्या सूत्रांपैकीं महावीरप्रणित ' सूर्यप्रज्ञप्ति ' या ज्योतिष-विषयक सूत्राच्या अध्ययन-अध्यापनाला व तें सूत्र समजण्याला मदत व्हावी.[६] जेव्हां ज्योतिषकरंडक ग्रंथ लिहिला गेला त्या काळीं भारतांत राशींचा चांगलाच प्रचार झाला होता. पण विशेष हें कीं ज्योतिषकरंडकांत राशींचा नाममात्रही उल्लेख नाहीं. याचें कारण मूळ सूर्यप्रज्ञप्ति या ग्रंथांतही तो नाहींच. तशांत आणखी विशेष म्हणजे आज आपण विशिष्ट लग्न दाखविण्यासाठीं जसें राशींचें नांवच वापरतों, जसें मेष लग्न, वृषभ लग्न इत्यादि, तसेंच अगदीं त्यांत नक्षत्रांचें नांव लग्नाला वापरलें आहे.[७] म्हणजे प्रचलित लग्नपरिमाण जसें राशीसापेक्ष आहे तसेंच तें नक्षत्रसापेक्ष या ज्योतिषकरंडकांत दिसतें. आणि जैनांच्या ज्योतिषकरंडकांत जें नक्षत्रसापेक्ष लग्नपरिमाण स्पष्ट दिसतें तेंच वेदांगांतील लग्नविषयक श्लोकार्धांत अभिप्रेत आहे असा माझा कयास मीं अन्यत्र[८] विशद करण्याचा प्रयत्न केला आहे. या माझ्या प्रयत्नाला अधिकारी ज्योतिर्विदांची[९] मान्यता मिळाली असली तरी ज्योतिषी म्हणून प्रसिद्ध नसलेल्या दोन[१०] विद्वानांच्या दृष्टीनें माझा निष्कर्ष मान्य करण्याच्या मार्गांत कांहीं अडचणी येतात. आणि त्या अडचणींचा निरास करण्याला उपयोग व्हावा म्हणूनच प्राग्राशिकालीं लग्नाचें स्वरूप काय होतें याचा येथें कांहीं नव्या पुराव्यांच्या मदतीनीं मी विचार करीत आहें.

ज्योतिषकरंडकांत विषुवांचीं[११] लग्नें दिलीं आहेत; विषुवांचीं सूर्यनक्षत्रें दिलीं[१२] आहेत; आणि यांतील अत्यंत महत्त्वाची बाब म्हणजे विषुव दिवसांच्या सूर्यनक्षत्रापासून दोन काटकोनावर म्हणजे १८० अंशांवर लग्नें येतात. म्हणजे लग्न म्हणून उल्लेखिलेलें नक्षत्र त्या त्या विषुव दिवशीं सायंकाळीं पूर्वक्षितिजावर उगवणारें असतें. जैन-ज्योतिष-करंडकांतलें हें वैशिष्ट्य त्या ग्रंथांतील ज्योतिषप्रणालीस धरूनच आहे. कारण त्याच

---

(५) ज्योतिषकरंडक ( वलभीयाचार्यीय )
(६) ,, सदर प्रास्ताविक पद्यें.
(७) ,, सदर पद्य २८८ ( दुसरें )
(८) Vide:- Lagna system of the Vedangjyotish.
(९) डॉ. के. ल. दप्तरी ह्यांचा सदर ग्रंथावरील अभिप्राय ( अप्रकाशित )
(१०) (१) ना. गो. चापेकर ( समीक्षकांतील लेख )
(२) म. म. पां. वा. काणे ( खाजगी पत्र )
(११) ज्योतिषकरंडक पद्य २८८ पहिलें
(१२) ,, दुसरें

ग्रंथांत व तदुत्तरकालीन 'काललोक प्रकाश' या जैन ज्योतिष ग्रंथांत विषुवकाल हा सायंकाळचाच घ्यावा म्हणून स्पष्ट उल्लेख[13] आहेत. जेव्हां ज्योतिषकरंडक उत्तरायण विषुवाचें स्वाति व दाक्षिणायन विषुवाचें आश्विनी लग्न म्हणतो तेव्हां त्याचा अर्थ वसंत संपाताच्या दिवशीं सायंकाळ स्वाति व शरद्संपाताच्या दिवशीं सायंकाळीं आश्विनी पूर्वक्षितिजावर असतात असाच घ्यावा लागतो. जर हींच नक्षत्रें त्या त्या दिवशींची सूर्योदयींचीं धरलीं तर ज्योतिषकरंडक ग्रंथ १२००० वर्षे मागें न्यावा लागेल। आचार्य मलयगिरी या बाराव्या शतकांत होऊन गेलेल्या अत्यंत विद्वान टीकाकाराची या श्लोकाचा अर्थ लावण्याचें कामीं फसगत झाली[14]. तशींच परवांच कै. झालेल्या डॉ. शामशास्त्री यांचीहि[15] झाली. त्यांच्या लक्षांत या ज्योतिषांतील विषुवकाल म्हणजे सायंकाळ ही परिभाषा आली नाहीं आणि त्यांनीं या श्लोकांतील वसंतसंपात व स्वाति लग्न आणि शारद्संपात व आश्विनी लग्न हा क्रम बुद्धिपुरःसर सोडून शरद् व स्वाति आणि वसंत व आश्विनी असाच अर्थ घेतला.[16] मागच्याच श्लोकांत हींच नक्षत्रें त्या त्या दिवशींच सूर्यनक्षत्रें म्हणून आलेलीं आहेत. असें असतां या निराळ्या श्लोकांचा हेतु ते उलगडूं शकले[17] नाहींत.

आतां याच लग्नाचा म्हणजे त्या- त्या दिवशीं सायंकाळीं पूर्वक्षितिजावर उगवणाऱ्या नक्षत्राचाच लग्न म्हणून उल्लेखिण्याचा वेदांगांतहि प्रघात असला पाहिजे असा माझा युक्तिवाद[18] मीं केलेला आहे. त्यावर एक टीकाकार[19] म्हणतात जैनांच्या ज्योतिषावरून वेदांगांचा अर्थ लावणें इष्ट नाहीं; कारण 'जैनांची परंपरा वैदिक कशावरून?'[20] अर्थात् ही शंका केवळ शंकेसाठींच शंका आहे. कारण ती जैनांचे ज्योतिष ग्रंथ न पाहतांच घेतली आहे. जैनांची नक्षत्रमाला, नक्षत्रांच्या देवता, त्यांची गणना, ऋतु, संज्ञा इत्यादि शेकडा ९९ गोष्टी वैदिक ज्योतिषांशीं मिळणाऱ्या म्हणजे त्यांतल्याच आहेत व जेवढा फरक वैदिक ज्योतिषाच्या विविध शास्त्रांत आहे तितकेंच फरकाचें प्रमाण जैन व वैदिक ज्योतिषांत सांपडेल. पण आतां जी या प्राग्राशीकालीन लग्नाची व्याख्या मीं या जैन ज्योतिषाच्या सहाय्यानें केली तीच अगदीं बरोबर असल्याचा

---

(१३) ज्योतिषकरंडक पद्यें २८० व २९०.

(१४) ज्योतिषकरंडक मलयगिरीची टीका पहा.

(१५) वेदांग ज्योतिष–शामशास्त्री ( ऋग्वेद ज्योतिष पद्य १७ वरील टीका पहा. )

(१६) सदर

(१७) सदर व खाजगी पत्र.

(१८) लग्नसिस्टिम ऑफ दि वेदांग ज्योतिष पहा

(१९) ना. गो. चापेकर समीक्षकाचा उपरोक्त अंक

(२०) सदर

निर्वाळा देणारा एक नवा आधार आपणापुढें आतां देतों आणि तो जैन वाङ्मयांतला नसून वेदानुयायांच्या वाङ्मयांतला आहे.

स षड्भसूर्यात् समयश्च लग्नम्।

सूर्यापासून सहा राशींवरचा काळ म्हणजे लग्न. तें रात्रींच असतें. कारण त्याच्या मागील चरणांतच तसें म्हटलें आहे. 'इष्टासवेह्नी प्रभवन्ति रात्रौ। स [२१]षड्भसूर्यात् समयश्च लग्नम्'। 'प्रभवन्ति रात्रौ'चाच अर्थ 'प्रदोषकाले विज्ञेयं[२२]' यांत किंवा 'अचक्षुविषये गते[२३] सूर्ये' यांत अभिप्रेत आहे. अर्थात जैन ज्योतिष व वैदिक किंवा पौराणिक ज्योतिष या दोघांची या बाबतींत एकवाक्यता आहे.

या लग्नाचा दुसरा महत्त्वाचा विशेष लक्षांत ठेवावयाचा तो असा कीं, त्याच्या प्राचीनतम अवस्थेंत सबंध अहोरात्रांत एकच लग्न असे. क्षितिजावर उदय पावणाऱ्या राशी किंवा नक्षत्रागणिक एका अहोरात्रांत त्याचे १२ किंवा २७ चें एक वर्तुळ पूर्ण होत नसे. तर सायंकाळीं पूर्वक्षितिजावर उदय पावणारें नक्षत्र व नंतर राशी हें लग्न म्हटलें जात असे. आणि अर्थात् नक्षत्रात्मक लग्नाच्या काळीं सूर्यनक्षत्रांशीं पंधरा नक्षत्रांच्या अंतरानें ते बदलत[२४] असे व राश्यात्मक लग्नाच्या वेळीं सहाव्या राशीवर तें येत असे, असें दिसतें.

---

## २ हिंदुस्थानांतील शाक्त संप्रदायाच्या इतिहासाची रूपरेषा

( प्रा. ह. वा. भिडे, एम्. ए.-अहमदाबाद )

+भारतीय शाक्त संप्रदाय व त्याचा इतिहास हा फार मोठा विषय आहे. या संप्रदायाचें वास्तविक स्वरूप समजण्याकरितां जे ग्रंथ पाहिले पाहिजेत त्यांपैकीं कांहीं प्रकाशित झाले आहेत; पण बरेचसे अप्रकाशित आहेत. या संप्रदायाच्या इष्टानिष्टतेबद्दल बराच विचार झाला आहे-पूर्वीं व अलीकडेही-पण, ऐतिहासिक दृष्टीनें त्याचें अवलोकन करण्याचा प्रयत्न फारसा झालेला नाहीं.

ऐतिहासिक दृष्टीनें विचार करतांना प्रथम या संप्रदायाच्या स्वरूपाविषयीं स्पष्टीकरण झालें पाहिजे; कारण, त्याविषयीं पुष्कळ गैरसमज प्रचलित आहेत.

---

(२१) वृद्ध वसिष्ठ सिद्धांत पृष्ठ २८ पद्य ५० ( उत्तरार्ध )

(२२) काललोक प्रकाश पद्य ७५ पृष्ठ ३९० (२३)ज्योतिषकरंडक पद्य २९०.

(२४) लग्नसिस्टिम ऑफ् दि वेदांगज्योतिष प्रकरण २ रें व ३ रें.

+ मंडळ संमे० ३५ वें ( इ.१९४८ ).

शक्ति–उपासना म्हणजे देवी–उपासना असें लोक सामान्यतः समजतात; व जादूटोणा, मंत्र–तंत्र, आभिचार प्रयोग, Black Magic, इत्यादि देवी–उपासनेचे पर्यायशब्द समजले जातात.

प्रस्तुत मी "शक्ति" शब्द फार व्यापक अर्थानें वापरीत आहे. 'जन्माद्यस्य यतः।' या सूत्रानुसार समग्र विश्वाच्या जन्म–स्थिति–लयांचें मूलकारण,[1] जें ब्रह्म तें "शक्ति" या शब्दानें येथें इष्ट आहे.

अर्थात् शक्ति–उपासना म्हणजे ब्रह्मोपासना[2].

पण सध्यां [मी हा संकुचित अर्थ न घेतां व्यापक अर्थ घेत आहे.] शाक्त–उपासना म्हणजे Mother-cult (मातृ–उपासना) असेंही म्हटल्यास फारशी हरकत नाहीं.

मातृपूजेचा धर्म फार प्राचीन कालापासून, सर्व देशांत,–प्राचीन व अर्वाचीन–चालत आला आहे. सध्यां ज्ञात असलेल्या संस्कृतींत, ईजिप्त व सुमेर येथील संस्कृति अत्यंत प्राचीन समजल्या जातात. नंतरच्या बॅबिलोनियन्, ॲसीरियन्, क्रीटन्, खाल्डियन्, हिब्रू, फोनीशियन् इत्यादि. सर्वांत अलीकडील म्हणजे, ग्रीक, रोमन व ख्रिस्ती या सर्व पाश्चात्य देशांत मातृपूजेचा सार्वजनीन प्रचार होता. पूर्वेकडील देश, चीन व हिंदुस्थान यांच्यांतही हा उपासना–प्रकार होताच. हिंदुस्थानांतील वैदिक संस्कृतींत शक्ति–उपासना हें फार महत्त्वाचें अंग होतें. गेल्या पन्नास वर्षांत, मोहेंजोदडो, हाडप्पा इ० ठिकाणीं उत्खननें करतांना जे अवशेष सांपडले आहेत ते वैदिकाहून भिन्न अशा एका अन्य संस्कृतीचे आहेत, असें कांहींचें मत आहे. तें कांहींहि असलें तरी, दोन गोष्टींबद्दल एकमत आहे. ते अवशेष निदान तीन–चार हजार वर्षांचे जुने आहेत म्हणून त्यांनीं सूचित संस्कृति कमींत कमी तितकी प्राचीन समजली पाहिजे. तसेंच त्या अवशेषांत शक्ति–पूजेच्या निदर्शक वस्तु इतक्या सांपडतात कीं त्यामुळें त्या काळीं त्या लोकांत शक्ति–पूजेचा प्रचार सर्वत्र असावा असें म्हणतां येईल. म्हणजे हिंदुस्थानच्या त्या भागांतील शक्ति–पूजेचें प्राचीनत्व व व्यापकत्व, हीं सर्वांना मान्य आहेत. वैदिक धर्मांतही शक्ति–उपासना कशी व्यापून राहिली आहे तें मीं दुसऱ्या

---

१ 'सत्त्वादिस्थैरगणितगुणैर्हन्त विश्वं प्रसूय
व्यक्तं धत्ते प्रहसनकरी या कुमारीति संज्ञाम्।
मोहध्वान्तप्रसरविरतिर्विश्वमूर्तिः समन्ता–
द्याद्या शक्तिः स्फुरतु मम सा दीपवद्धृद्गेहे ॥

२ 'शक्ति' चा अर्थ देवी असाही आहे. उ० परानन्द सूत्रांत साठ ईश्वर सांगितले आहेत— ब्रह्मविष्णुशिवसूर्यगणेशशक्तिभैरवाश्चेश्वराः ॥ ६.८ ॥ येथें देवी असा अर्थ स्पष्ट आहे.

*एका लेखांत दाखवून दिलें आहे. वेदांची प्राचीनता बहुतेकांना मान्य आहेच. म्हणजे हिंदुस्थानांत ही शक्ति–उपासना फार प्राचीन कालापासून चालत आली आहे असें म्हणण्यास कांहींहि हरकत नाहीं.

वर उल्लेखिलेल्या सर्व देशांत शक्ति–उपासना ही त्या त्या देशांतील धर्माचें एक प्रमुख अंग अशी होती. हिंदुस्थानांतहि तशीच वस्तुस्थिति होती. येथवर आल्यावर एका महत्त्वाच्या मुद्द्याची स्पष्टता केली पाहिजे.

हिंदुस्थानांत तीन धर्म मुख्यतः होत; प्राचीन वैदिक धर्म व त्याच्या मानानें अर्वाचीन बौद्ध धर्म व जैन धर्म. हिंदुस्थानांतील मूळचे हे तीन्ही धर्म जगांतील इतर सर्व धर्मांहून कांहीं मुख्य बाबतींत अगदीं वेगळे आहेत. हिंदी धर्मांचें हें जें खास वैशिष्ट्य आहे तेंच भारतीय शाक्त–संप्रदायाचेंहि असल्यामुळें तो इतर सर्व भारतीयेतर शाक्त–संप्रदायांहून अगदीं भिन्न आहे.

जगन्नियन्त्या ईश्वरानें दया करावी व या जन्मांतील दुःखें दूर करून सुख मिळवून द्यावें हें सर्वांचें ध्येय असतें. या ध्येयसिद्धीकरितां जीं वेगवेगळीं साधनें ते वेगवेगळे मार्ग. एवढ्यापुरतें सर्व धर्मांचें ऐक्य आहे. आपल्यांत धर्माच्या व्याख्या अनेक आहेत. त्यांतील एक सांगते कीं धर्म हा अभ्युदय व निःश्रेयस् यांचें कारण आहे. या जन्मांतील अनिष्ट-परिहार व इष्टप्राप्ति हीं धर्मरूप साधनानें सिद्ध करतां येतात, इतकें सर्व धर्मांना मान्य आहे[१]. या जन्मांतील अभ्युदय झाला. पण मृत्यूनंतरची कोणती अवस्था व तेथें अभ्युदय आहे कीं नाहीं याविषयीं भारतीय धर्मांत जे विचार आहेत ते इतर कोणत्याही धर्मांत नाहींत. 'स्वकर्मसूत्रग्रथितो हि लोकः ।' व 'पुनरपि जननं पुनरपि मरणम् ।' कर्मविपाक व पुनर्जन्म हे मूलभूत सिद्धान्त आपण मानतों, ते इतर कोणी मानतात असें आढळून येत नाहीं. हें आपल्या धर्मांचें एक खास वैशिष्ट्य आहे. मृत्यूनंतर परलोकीं वास्तव्य करावें लागतें — किती वेळ तें ज्याच्या त्याच्या कर्मानुसार असतें — व तेथेंहि दुःख-परिहार व सुखप्राप्ति हीं कर्मानुगुण असतात. परलोकींचा कर्मभोग संपल्यावर मग पुन्हा इहलोकीं जन्म घ्यावा लागतो. अशा प्रकारें इहपरलोकीं येण्याजाण्याचे फेरे जिवाला करावे लागतात. या दोन्ही लोकांत अभ्युदयाला कारणीभूत धर्म असतो. हे जन्ममरणाचे फेरे फिटणें म्हणजेच अपुनरावृत्ति अथवा मोक्ष. संसारांत सुखदुःखांचें प्रमाण किती आहे याबद्दलही वैदिक, बौद्ध आणि जैन धर्मांचें एकमत आहे. "सुख पाहतां जवापाडें । दुःख पर्वताएवढें ॥" हीच या तीनही धर्मांची शिकवण आहे. हें दुःख तीन प्रकारचें–आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक. या दुःखत्रयाचा आघात टाळा

१ एखादा धर्म असाही असूं शकेल कीं ज्याच्या मतें हा जन्म म्हणजे दुःखमय आहे व ईश्वरानें दया केल्यास मृत्यूनंतरच सुखप्राप्ति होऊं शकते. *टीप ५ पहा.

म्हणजे जीव संसारचक्रांतून सुटतो,[४] व 'न स पुनरावर्तते।' – तो पुन्हां जन्म घेत नाहीं. हें निःश्रेयस व यालाही धर्मच कारणीभूत असतो. भारतीय तीन्ही धर्मांनीं अशा प्रकारचा मोक्ष मिळविण्याचें ध्येय लोकांपुढें ठेविलें आहे. ही आपल्या धर्माची दुसरी मुख्य विशिष्टता. ही मोक्षाची कल्पना इतर कोणत्याही धर्मांत नाहीं.

शाक्त–संप्रदाय हा वैदिक धर्माचें अंग असल्यामुळें त्यांत हें सर्व आहे. म्हणजे शाक्त मार्ग हा अभ्युदय–निःश्रेयस् प्राप्ति करून देण्याचें साधन आहे. पुष्कळशा शाक्त म्हणविणारांना हें माहीत नसतें. त्यांच्या विपरीत आचरणानें विपरीत ग्रह उत्पन्न होणें साहाजिक आहे; म्हणूनच या मार्गाला वेदबाह्य व निन्द्य ठरविण्याचा प्रयत्न होत असतो. पण इतिहास–लेखकानें पक्षपातरहित राहून अवलोकन केलें पाहिजे.

शाक्त–संप्रदायाचें तात्त्विक स्वरूप कसें आहे, व त्याचा वैदिक संप्रदायाशीं कसा निकट संबंध आहे त्याचें दिग्दर्शन मीं अन्य ठिकाणीं केलें आहे.[५] प्रस्तुत एवढेंच सांगणें अवश्य आहे कीं वेदप्रणीत नित्यनैमित्तिक कर्में निष्कामबुद्धीनें केल्यानें चित्तशुद्धि होऊन मनुष्य उपासनेचा अधिकारी होतो. उपासना ही सकाम, अथवा निष्काम असूं शकते. निष्काम उपासनेची सिद्धि म्हणजे ज्ञानप्राप्ति, व ज्ञानानें मोक्ष ( ज्ञानात्कैवल्यम्। ) असे हे मोक्षापर्यंतचे मोठे टप्पे आहेत. त्यापैकीं चित्तशुद्धीचा टप्पा गांठल्यावर तेथून उपासनांचे वेगवेगळे फाटे फुटतात. त्यांपैकीं एक शाक्त–मार्ग होय. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे, हा संप्रदाय उपासनाप्रधान असून त्याचे ध्येय मोक्षप्राप्ति आहे.

वैदिक तत्त्वज्ञानांत केवलाद्वैत, विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत, द्वैत इत्यादि मतभेद आहेत. शाक्त तत्त्वज्ञानांतही हे सर्व प्रकार दिसून येतात. या मार्गांत जी त्रिपुरोपासना आहे ती मात्र पूर्ण अद्वैतनिष्ठ आहे. पूर्णाद्वैत हा त्रैपुरसिद्धान्त श्रीशङ्कराचार्यांच्या भाष्यत्रयींत ज्या अद्वैताचें प्रतिपादन आहे, तें या पूर्णाद्वैताशीं पूर्णत्वया जमतें[६]. अशा प्रकारें या शाक्त मार्गांतील उपासना, ज्ञान व मोक्षप्राप्तीचें ध्येय हीं वैदिक धर्माचींच अंगें आहेत; तरीहि त्याच्या वैदिक–अवैदिकत्वाबद्दल चर्चा कित्येक शतकें चालू आहे. श्री-शंकराचार्यांच्या "सौन्दर्यलहरी" नामक स्तोत्रावर लक्ष्मीधराची टीका आहे. लक्ष्मीधर

---

४ [ सांख्यकारिका १ ]

५ [ वेदशास्त्रदीपिका – हीरकमहोत्सव ग्रन्थ, निबंधक्रम १६, "वेद व आगम" ]

६ हा एक फार सुंदर आणि मननीय विषय आहे. त्याचें विवेचन प्रसंगानुसार अन्यत्र करणार आहे. सध्यां एवढेंच सांगतो कीं, श्रीशंकराचार्यांच्या नंतर त्यांच्या अनुयायांनीं प्रसिद्धीस आणिलेला विवर्तवाद अथवा मायावाद या पूर्णाद्वैतसिद्धान्ताशीं सुसंगत दिसत नाहीं.

७०० वर्षांपूर्वी होऊन गेला.[७] त्यानें शाक्तमार्गाचे तीन वर्ग पाडले आहेत – समयाचार, कौलाचार व मिश्र. या तिहींपैकीं, फक्त समयाचारच वैदिक असून कौल व मिश्र हे मार्ग वेदबाह्य व निंद्य होत, असें त्याचें आग्रहपूर्वक म्हणणें आहे.

श्री शंकराचार्यांचे परमगुरु श्री गौडपादाचार्य यांच्या नांवानें एक स्तोत्र प्रसिद्ध आहे. त्याचें नांव "सुभगोदयस्तुति". त्यांतही कौल व मिश्र हीं निन्दित मतें आहेत असें म्हटलें आहे.[८] इ. स. ७८० ते ८१२ हा श्रीशंकराचार्यांचा काल समजला तर इ. स.चें आठवें शतक, पूर्वार्ध, हा श्री गौडपादांचा काल मानणें चूक होणार नाहीं. म्हणजे इ. स. च्या आठव्या शतकापासून, शाक्तांचे कांहीं विशिष्ट संप्रदाय टीकाविषय झाल्याचें दिसून येतें. याप्रमाणें १०००।१२०० वर्षें या संप्रदायावर टीका होत आली आहे.[९] मराठी वाङ्मयांतूनही हा टीकेचा सूर दिसून येतो. श्री रामदास, दिनकर गोसावी इत्यादि मराठी ग्रंथकारांनीं शाक्त पंथीयांच्या दुराचारावर टीका केली आहे. "विचार-सागर" या हिंदी वेदान्त ग्रंथांत पुष्कळ टीका आहे. अगदीं अलीकडे लोकहितवादी व विष्णुबोवा ब्रह्मचारी यांच्या ग्रंथांतही अशीच टीका केलेली आढळून येते. प्रसिद्ध वंगीय संशोधक हरप्रसाद शास्त्री इत्यादि भारतीय व 'एग्लिङ्ग' इत्यादि परदेशी लेखक यांचेंही विरोधी लिखाण पुष्कळ आहे. सध्यां सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं, शाक्तपन्थ उपादेय कीं हेय, वैदिक कीं अवैदिक या विषयावर ऐतिहासिक दृष्टीनें लिहूं म्हटल्यास, अभ्यसनीय असें विशाल साहित्य उपलब्ध आहे.

आतां शाक्तसंप्रदायांच्या साहित्याचा इतिहासदृष्ट्या विचार करावयाचा. पण त्यापूर्वीं एकदोन गोष्टींचें स्पष्टीकरण झालें पाहिजे. शाक्तमार्गांत कोणकोणत्या गोष्टींचा अंतर्भाव होतो तें निश्चित करून मग तद्विषयक साहित्याचा परामर्श घेतला पाहिजे.

वर सांगितलें आहेच कीं वैदिक कर्में निष्काम बुद्धीनें केल्यानें चित्तशुद्धि होते, आणि त्या योगें जीव उपासनेचा अधिकारी होतो. शाक्तमार्ग हा मुख्यत्वेंकरून उपासना-मार्ग आहे व त्याचें ध्येय ब्रह्मप्राप्ति हें आहे. म्हणून शाक्तशास्त्रांत उपासना व ज्ञान हे मुख्य विषय होत. उपासना म्हणजे काय तेंही बरोबर समजून घेतलें पाहिजे. शाक्त उपासनेंत मुख्य दोन उपास्यें आहेत-शिव आणि शक्ति. उपास्यद्वैतामुळें अद्वैतसिद्धान्ताला

---

७ Laxmidhara, who lived in the thirteenth, or possibly in the twelfth century.........इ. P'ougne चें the S'aktas पृ. ४३.

८ श्लोक १८

९ शाक्त मार्ग वैदिक कीं अवैदिक ? यावर एक वेगळा स्वतंत्र निबंध मीं लिहिला आहे. टीप ५ पहा.

कांहींहि बाध येत नाहीं. कारण 'शक्तिशक्तिमतोरभेदः।' हें मूळ तत्त्व आहे.[१०] असो. म्हणून शाक्त मार्गांत शिवोपासना आणि शक्ति-उपासना या दोहोंचा अंतर्भाव होतो.

शाक्त उपास्य शिव-शक्ति म्हणजे औपनिषद् सगुण ब्रह्म होय. श्रीशंकराचार्य म्हणतात कीं, सगुण ब्रह्म उपास्य व निर्गुण ब्रह्म ज्ञेय आहे. सगुणांतून निर्गुणांत जावयाचें असतें. शाक्त संप्रदायाचाही अगदीं हाच सिद्धान्त आहे. उपासनेंत द्वैत असतें, पण उपासनेची पूर्णता अद्वैतसिद्धींत होते.

अन्तिम अद्वैतज्ञान एक; पण उपान्त्य उपासना अनेक. उपनिषदांत वेगवेगळ्या उपासना सांगितलेल्या आढळतात-प्रणवोपासना, शाण्डिल्यविद्या, पञ्चाग्नि-उपासना इत्यादि. असे उपासना भेद शाक्त मार्गांतही आहेत. शिवशक्तींच्या उपासनांचे प्रकार पुष्कळ आहेत. उपासनेचीं रूपें अनेक आहेत. मूर्ति, यन्त्र, बाण इ० बाह्य वस्तूंची पूजाअर्चा हा एक उपासना प्रकार. सप्तशतीसारख्या ग्रन्थांचीं पुरश्चरणें करणें, होम-हवन करणें, न्यास वगैरे करणें, वगैरे बाह्य विधि हा एक दुसरा प्रकार. हें उपासनेचें स्थूलरूप होय. याहून श्रेष्ठ आन्तर उपासना; तें सूक्ष्म रूप; ही आन्तर उपासनाही विविध प्रकारची आहे. बीजाक्षरें, मन्त्र इत्यादिकांचा मानसिक जप, नामजप, लययोग, कुण्डलिनियोग वगैरे योगाचे प्रकार, या सर्वांचा आन्तर उपासनेंत अन्तर्भाव होतो. सूक्ष्म उपासनेच्याही वरची पर उपासना आहे. ती सिद्ध कोटींतले जीव करूं शकतात.[११]

शाक्तसंप्रदायाच्या भागांपैकीं एक अत्यंत महत्त्वाचा भाग आहे, त्याचाही विचार इतिहासकारानें केला पाहिजे. तो भाग म्हणजे अद्वैतप्रापक योगमार्ग. नुकतेच उपासनेचे जे तीन प्रकार सांगितले ते या योगाच्या अंगोदरच्या पायऱ्यांसारखे आहेत. स्थूलानंतर सूक्ष्म व नंतर पर, जिचा शेवट सहज समाधींत होतो ती ही अवस्था योगसाध्यच आहे असें शाक्तसंप्रदाय मानतो.[१२] किंबहुना शाक्त मार्ग म्हणजे अद्वैतप्रापक

---

१० या मुद्द्यावर पुष्कळ लिहितां येण्यासारखें आहे; पण तें सध्यां अप्रस्तुत आहे. असो. बुद्धोत्तर काळांत लक्ष्मी-विष्णु, राधा-कृष्ण व सीता-राम यांच्या उपासना सुरू झाल्या, त्यांच्यांतही अंतिम अद्वैताची भावना स्पष्टपणें वर्णिली आहे. याबद्दलच थोडासा निर्देश 'वेद व आगम' या निबंधांत आला आहे. या तीन्ही उपासनामार्गांत, जेथें अद्वैताचा स्वीकार केलेला नाहीं तेथेंही शक्तितत्त्वाच्या-म्हणजे लक्ष्मी, राधा, सीता यांच्या प्राधान्याचा अंगीकार केला आहे. म्हणजे "शाक्त साहित्याचा" विचार करते वेळीं या उपासनांबद्दलचें जें साहित्य आहे त्याचाहि विचार केला पाहिजे, अशी आवश्यकता प्राप्त होते. परंतु सध्यां स्थल-काल-संकोचामुळें तसें करतां येत नाहीं.

११ ज्याला भक्तिमार्ग म्हणतात तो उपासनेचा एक प्रकार आहे.

१२ मग 'ज्ञानादेव तु कैवल्यम्।' या वाक्याची संगति [illegible] लावावयाची अशी शंका येईल. त्याचें थोडक्यांत उत्तर असें कीं, हें कैवल्य योगानेंच होत असतें.

योगमार्ग होय. 'अहं ब्रह्मास्मि।' व 'सर्वं खल्विदं ब्रह्म।' हा अद्वयानन्दाचा अनुभव शाक्त योगमार्गानेंच गेल्यानें मिळणारा आहे.

याप्रकारें शाक्तसंप्रदायांत शिवोपासना, शक्ति-उपासना व कैवल्यपदप्रापक योग यांचा अविभाज्य परस्पर संबंध आहे. म्हणून शाक्त संप्रदायाच्या साहित्याच्या इतिहासाचा विचार करतांना या तिहींकरच्या साहित्याचा विचार झाला पाहिजे.

याचा ऐतिहासिक दृष्टीनें विचार करतां, स्थूलमानानें तीन कालविभाग पाडतां येतात. पहिला बुद्धपूर्व काल, दुसरा बुद्धोत्तर १०००।१२०० वर्षें श्रीशंकराचार्यापर्यंतचा काल आणि तिसरा श्रीशंकराचार्योत्तर काल.

पहिल्या काळांतील साहित्य मुख्यतः दोन प्रकारचें आहे. पहिल्या प्रकारचें म्हणजे ग्रन्थस्थ साहित्य. दुसऱ्या प्रकारचें म्हणजे मोहेंजोदारो वगैरे ठिकाणीं उत्खननानें उपलब्ध झालेलें साहित्य. वेद, ब्राह्मणें, आरण्यकें, श्रौतादि सूत्रग्रन्थ, उपनिषदें व बुद्धपूर्व संस्कृति दर्शविणारा महाभारत-रामायण यांचा भाग हे या काळाबद्दलचे मुख्य ग्रन्थ होत. बौद्ध वाङ्मयापैकीं जातककथा, दिव्यावदान इत्यादि ग्रन्थांतहि बुद्धाच्या पूर्वी असलेल्या सामाजिक व धार्मिक चालीरीतींबद्दल पुष्कळ माहिती आढळते. तेथें शिव-शक्ति व विष्णु यांच्या उपासनांचा प्रचार बुद्धपूर्वकालीं होता, अशाबद्दलचा पुरावा सांपडतो. बुद्धाच्या शिकवणुकीवर उपनिषदांचा व या उपासनांचा परिणाम बराच झाला आहे असें बौद्ध वाङ्मयाचे अभ्यासी विद्वान् म्हणतात.

यांपैकीं सर्वांत जुनें वाङ्मय म्हणजे वेद, जे आपल्या धर्माचें प्रभवस्थान होत. वेदांत शिव म्हणजे रुद्र आणि प्रजापति यांच्या उपासनेविषयींचे उल्लेख स्पष्ट आहेत. आद्याशक्ति वेगवेगळ्या रूपांत तेथें दिसून येते. अदिति ही सर्वांची माता, शुद्ध-सत्त्वात्मिका विद्या आहे; तिच्या विरोधी मलिनतत्त्वा अविद्याशक्तीला दिति म्हटलें आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, अदितिरूपानें शक्तीचा मातृभाव वर्णिला आहे. अत्यंत चमत्कृतियुक्त उषादेवीच्या सूक्तांत शक्तीचा कुमारीभाव वर्णिला आहे. सूर्या-देवीच्या सूक्तांत पत्नीभाव आहे. आम्भृण-मुनिपुत्रीदृष्ट सूक्तांत अद्वैतबोधक शाक्त तत्त्वज्ञान दिसून येतें.

नंतर ब्राह्मणारण्यकें येतात. वैदिक कर्मप्रक्रिया ही ज्ञान व उपासना यांवर अधिष्ठित आहे. म्हणजे बाह्य जड कर्मप्रक्रियेला आधिदैविक व आध्यात्मिक पृष्ठभाग आहे. त्याचें बरेंच सूचन या ब्राह्मणारण्यकांत मिळतें. हे वैदिक कर्मतन्त्र शाक्त तन्त्राशी समान्तर आहे असें दिसून येतें. उदाहरणार्थ, ऐतरेयारण्यकांत महाव्रताच्या विधीचें विवेचन आहे; त्यांत शाक्त मार्गांतील क्रियाकलाप दिसून येईल. पौण्डरीक यागांतही बरीच शाक्त प्रक्रिया आहे. असें ब्रह्मसूत्रांचे एक भाष्यकार श्रीकराचार्य म्हणतात.

तैत्तिरिय आरण्यकांत श्रीचक्राचें सूचन आहे.[१३] ब्राह्मण ग्रन्थांत[१४] सृष्ट्युत्पत्तीविषयींचे विचार ग्रथित केले आहेत. प्रजापति अथवा ब्रह्म जगाचें मूलकारण. 'त्यानें ईक्षण केलें' 'एक मी, मीं पुष्कळ व्हावें अशी त्यानें इच्छा केली' 'त्यानें तप केलें' तेणेंकरून 'तें घनत्वाला प्राप्त झालें' इत्यादि जें वर्णन आहे तें शाक्त प्रक्रियेशीं अगदीं जमतें. जगदुत्पत्तिकालीं सुप्त आद्याशक्ति, इच्छाशक्ति, ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति या रूपांनीं आविर्भूत होते, असें शाक्त तत्त्वज्ञान शिकवितें. ईक्षण आणि कामना करणें हा इच्छा-शक्तीचा अवतार; नंतर ज्ञानरूप तपाच्या योगानें घनत्वप्राप्तिरूप क्रियाशक्ति अवतरली. आणखी पुष्कळ साम्य दाखवितां येण्यासारखें आहे. सध्यां नुसतें दिग्दर्शन केलें आहे. सांगण्याचा उद्देश एवढाच कीं, ब्राह्मणें व आरण्यकें यांचा अभ्यास या दृष्टीनें झाला पाहिजे. तसेंच श्रौत गृह्यसूत्रें आहेत व त्यांविषयींही हेंच विधान करतां येतें.

शेवटीं शिरोभूत उपनिषदें येतात. त्यांत कर्मकाण्डानंतरचीं उपासना व ज्ञान हीं काण्डें आहेत. शाक्तमार्ग हा उपासना–ज्ञानप्रधान आहे असें वर सांगितलेंच आहे. म्हणून उपनिषदांशीं शाक्तग्रन्थांचा मेळ जास्तींत जास्ती बसतो. ब्रह्मचैतन्य म्हणजे शक्ति; तद्बोधक उपनिषदें मुख्यतः हीं आहेतः– १ त्रिपुरा, २ त्रिपुरातापिनी, ३ देवी, ४ बह्वृचा, ५ भावना, ६ सौभाग्यलक्ष्मी, ७ सीता, ८ सरस्वती, हृदय (यांच्यावर उपनिषद् ब्रह्म-योग्यांची व्याख्या आहे) ९ कौल, १० काली, ११ तारा, १२ अद्वैतभाव, १३ अरुणा (हीं Avalon च्या Tantrik Texts च्या व्हॉ. २१ मध्यें सटीक छापलीं आहेत.[१५] याशिवाय अप्रकाशित अशीं उपनिषदें कुठें कुठें असावयाचा संभव आहे. ऐतरेयादि इतर ब्राह्म (ब्रह्मविषयक) उपनिषदांतलें अद्वैतज्ञान शाक्त अद्वैतज्ञानाशीं एकरूप आहे.

उपनिषदांनंतरचे महत्त्वाचे ग्रन्थ म्हणजे महाभारत व हरिवंश. त्यांच्यांत देवी-उपासनेचे स्पष्ट उल्लेख आहेत. शान्तिपर्वांत जें सांख्य–योग–ज्ञान सांगितलें आहे तें शाक्ततत्त्वज्ञानाशीं सुसंगतच आहे. श्रीमद्भगवद्गीतेवर काश्मीरचे परममाहेश्वर अभि-नवगुप्त यांनीं टीका लिहिली आहे. तिच्यांत गीतेंतील शाक्त–अद्वैताची स्फुटता उत्तम रीतीनें केली आहे. शैव व शाक्त तत्त्वज्ञ गीतेचें प्रामाण्य मानणारे आहेत.

बुद्धपूर्वकालांतील ग्रन्थस्थ साहित्यापुरतें दिग्दर्शन येथवर झालें. या काळांतील शिलालेख, ताम्रपत्रें वगैरे मिळत नाहींत. पण मोहेंजोदडो व हाडप्पा येथील उत्खननांत पुष्कळ साहित्य उपलब्ध झालें आहे. त्याचा विचार झाला पाहिजे.

---

१३ हा ग्रंथ सध्यां हाताशीं नसल्यामुळें बरोबर संदर्भ देऊं शकत नाहीं.

१४ प्र. १, अ. २८

१५ Some Unpublished Upanishads नांवाच्या ग्रन्थांत राधा–कृष्ण व काली यांच्या उपासनांचीं रहस्यें सांगणारीं उपनिषदें छापलीं आहेत.

वर म्हटलें आहे कीं शक्ति–उपासनेचा शिवोपासना व योगमार्ग यांच्याशीं अविभाज्य संबंध आहे. आतांपर्यंत मीं शाक्तसंप्रदायापुरतेंच सांगितलें आहे. शैवसंप्रदाय व योग यांबद्दलही बुद्धपूर्वकालिक ग्रन्थस्थ व उत्खननप्राप्त विपुल साहित्य उपलब्ध आहे. त्याचें निरीक्षण सध्यां करीत नाहीं. दिशा वर दाखविलीच आहे. यापुढें श्रीशंकराचार्यपूर्वकालिक व तदुत्तरकालिक साहित्याविषयीं सांगणार आहे व तेंहि शाक्तसंप्रदायापुरतेंच आहे.

बुद्धापासून आचार्यांपर्यंतचा काल १२००।१३०० वर्षांचा मानला जातो. खिस्तपूर्व ५ व्या शतकापासून इ० स० च्या ८ व्या शतकापर्यंत या कालाचें महत्त्व फार आहे. यांत वेदविरोधी बौद्ध व जैनधर्म उदयास आले. मतांमतांचा गलबला व तीव्र विचारसङ्घर्ष तत्पूर्वी बराच काळ चालत होता असें वाटतें; कारण त्यांवाचून नवीन धर्मांची पार्श्वभूमि आवश्यक तयार होऊं शकली नसती. हे धर्म पूर्णतया वैदिकधर्मनिरपेक्ष नव्हते; तें मीं अन्यत्र दाखविलें आहे. (अप्रकाशित)

या काळांत ग्रन्थनिबद्ध साहित्याचा विकास झाला. बाह्य स्थूल प्रतीकांची पूजा करावयाची पद्धत मोठ्या प्रमाणावर सुरू झाली. यापूर्वीचें वैदिक कर्मकाण्ड मूर्तिनिरपेक्ष होतें; आतां तें मूर्तिसापेक्ष झालें. त्यामुळें तदनुकूल पूजा, विधि, जप, ध्यान, उपासना इत्यादींना सुरुवात झाली. बुद्ध व महावीर हे निरीश्वरवादी असावेत; पण कालांतरानें त्यांच्या अनुयायांना बाह्य प्रतीकें व आलंबनें ह्यांचें साहाय्य घेतल्याशिवाय बुद्ध–महावीरांचें ध्येय प्राप्त करून घेणें शक्य झालें नाहीं. या कामीं त्यांना वैदिक उपासनापद्धतीचा चांगला उपयोग झाला. वेद व आगम यांच्या प्रक्रियेच्या आधारानें त्यांनीं आपल्याला अनुकूल अशा प्रक्रिया तयार केल्या. आर्यांच्या देवतांना गौणस्थान दिलें; कित्येकदां त्यांचें स्वरूप बदललें; कित्येक नवीन देवतांची निर्मिति झाली; पण या सर्व खटपटींत मूळ आधार आर्यांच्या देवतांच्या उपासनांचाच होता.

या काळापूर्वीं वैदिक उपासना नव्हती असें नव्हे. पण ती अत्यंत गुप्त होती. लेखनिबद्ध नसतांनाही वेद ज्याप्रमाणें वेगवेगळ्या परंपरांतून सुरक्षित राहिले त्याप्रमाणें उपासनेचे भिन्न भिन्न संप्रदायही लोकांत प्रकट झाले नव्हते तरीही ठिकठिकाणीं वेगवेगळ्या परंपरांतून ते अखण्ड चालू राहिले होते. पण आतां हे उपासनामार्ग प्रकट करणें आवश्यक झालें. त्याला मुख्य कारण हें झालें असावें:–वेदविरोधकांनीं वैदिक उपासनांचा आधार घेतला खरा; पण, त्यांच्यांत जीं उपास्यें होतीं त्यांना विकृत करून टाकिलें. कांहीं ठिकाणीं हें विकृतीकरण वैदिकांना चीड आणण्यासारखें झालेलें आहे.

या काळांत शिव–शक्ति व विष्णु यांच्या उपासनांना प्राकट्य आलें. शिव व शक्ति यांच्या उपासनांचें साहचर्य पूर्वी होतें तें तसेंच चालू राहिलें. विष्णूपासनेचे संप्रदाय सुरू झाले. पाञ्चरात्र व कृष्णोपासना यांचा प्रसार होऊं लागला, जरी त्या वैष्णव उपासना

आहेत तरी त्यांच्यांत शिव-शक्ति उपासनेंतील बरींच तत्त्वें घेतलेलीं आहेत. म्हणून शाक्त संप्रदायाच्या इतिहासांत विष्णूपासनांचाही विचार करणें प्राप्त आहे. पण तो एका स्वतंत्र लेखाचा विषय आहे.

ख्रिस्तपूर्व दुसऱ्या व पहिल्या शतकापासून देवदेवींच्या मूर्ति करून त्यांची पूजा, अर्चा व उपासना करण्याच्या पद्धतीचा विशेष प्रसार झाला. पुरातत्त्वज्ञ हिरानन्द-शास्त्री म्हणतात कीं शिव-शक्ति यांची प्राचीनतम मूर्ति लखनौच्या संग्रहालयांत आहे. ती अलाहाबाद प्रांतांत भीव नांवाच्या गांवीं कित्येक वर्षांपूर्वी प्राप्त झाली होती. या मूर्तीच्या डाव्या बाजूला वैक्रम प्रथम शताब्दींतल्या लिपीमधील एक लेख आहे. मद्रास इलाख्यांत रेणीगुण्ट स्टेशनापासून सुमारें ६ मैलावर गुडिमल्लम् गांव आहे. तेथें परशुरामेश्वर मन्दिर आहे. तेथें कामपरिमाण शिवलिङ्ग आहे. तें ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकांतलें आहे. मथुरेच्या संग्रहालयांत प्राचीन मूर्तीचा उत्तम संग्रह आहे. त्यांत विष्णु, सूर्य, दुर्गा, लक्ष्मी, सरस्वती, सप्तमातृका, गणपति, इन्द्र, लोकपाल, ब्रह्मा यांच्या जुन्या मूर्ति पहाण्यास मिळतात.

इ. स. च्या दुसऱ्या शतकांत परदेशी कुशाण राजवंश उत्तरेकडे सत्ताधीश झाला होता. सौराष्ट्रांत क्षत्रपकुल राज्य करीत होतें. पैकीं कुशाणांच्या नाण्यांवर शिव व देवी यांच्या मूर्ति आहेत. याच सुमारास लकुलीश पाशुपतमताचा जोराचा प्रचार झाला होता. लकुलीशाच्या मूर्ति मध्य हिंदुस्थानचा पश्चिमभाग व सौराष्ट्र इकडे बऱ्याच सांपडतात.

इ. स. १५० ते ३०० पर्यंत नाग व भारशिव राजे यांच्या वेळच्या मूर्ति सांपडतात. हे सर्व शिव-शक्ति उपासक होते. इ. स. च्या ४ थ्या शतकापासून गुप्तकाल सुरू होतो. या कालांतील मूर्ति व नाणीं हीं शिव-शक्ति उपासना विस्तृत प्रमाणांत पसरली होती याची साक्ष देतात. इ. स. च्या नवव्या शतकापर्यंत या परिस्थितींत फारसा बदल झाला नव्हता.[16] भारतवर्षांत याप्रमाणें उपासनांचा विकास होत होता त्याबरोबरच बाहेर बृहत्तर भारत निर्माण होत होतें. या बृहत्तर भारताचे दोन विभाग आहेत– एक आशिया खण्डाचा पूर्व-दक्षिण भाग व दुसरा द्वीपमय भारत ( Indonesia अथवा Insulindia ). पहिल्यांत भारतचीन ( Indo-China ), कंबुज, चम्पा वगैरे प्रदेश आहेत. दुसऱ्यांत मलय, यव, बलि, सुवर्ण इत्यादि द्वीपें येतात. या सर्व ठिकाणीं वैदिक संस्कृतीचा प्रचार झपाट्यानें चालला होता. इ. स. च्या ५ व्या शतकापासूनचीं मन्दिरें व मूर्ति सांपडल्या आहेत. अर्थात् यापूर्वी कित्येक शतकें ही संस्कृति आपलेकडे

---

१६ गुप्त संवत् इ. स. ३१९।२० त सुरू झाला. श्री शंकराचार्य इ. स. च्या ९ व्या शतकाच्या आरंभीं होते असें सामान्यतः मानण्यांत येतें. माझें स्वतःचें मत वेगळें आहे. पण या वादांत शिरण्याची गरज रुथ्यां नाहीं. सामान्यतः विद्वानांना मान्य अशी जी कालगणना तिला अनुसरून वरील विवेचन आहे.

दृढमूल झालेली असली पाहिजे हें उघड आहे.[१७] दक्षिण भारतांतील पुष्कळशीं मन्दिरें, वेरुळचीं वगैरे लेणीं स्थापत्य व शिल्प याच काळांतील आहे. शाक्त संप्रदायाची व्याप्ति किती विशाल आहे, तें यावरून दिसून येतें.

या शिल्पसाहित्यासमवेत ग्रन्थस्थ साहित्यही या काळांत पुष्कळच निर्माण झालें आहे. शैव, शाक्त व वैष्णव संप्रदायांत प्रमाणभूत मानण्यांत येणारे जुने आगमादि ग्रन्थ याच काळांत प्रकट झाले.

या काळांतील शाक्तसंप्रदायी साहित्यापुरता विचार करावयाचा म्हटला तर, या साहित्याचे चार वर्ग पाडतां येतील— १ सूत्रसाहित्य, २ आगमग्रन्थ, ३ पुराणें आणि ४ स्तोत्रसाहित्य.

सूत्रसाहित्यांत ज्यांचीं नांवें माहीत आहेत तीं सूत्रें हीं:— १ परशुरामकृत कल्पसूत्रें (हें छापलें आहे), २ अगस्त्यकृत शक्तिसूत्रें ३ भारद्वाजकृत शक्तिसूत्रें, (या दोहोंचीं हस्तलिखितें उपलब्ध आहेत), ४ नागानन्दकृत शक्तिसूत्रें, ५ अङ्गिरामहर्षिकृत देवीमीमांसादर्शन-सूत्रें, ६ गौडपादाचार्यकृत श्रीविद्यारत्नसूत्रें, (हें छापलें आहे), ७ काश्मीरकडील प्रत्यभिज्ञामताचीं शक्तिसूत्रें (हें प्रसिद्ध झालें आहे).

आगमसाहित्य तर याहून विशाल आहे. गौडपादाचार्यांनीं आपल्या 'सुभगोदय स्तुति' नांवाच्या स्तोत्रांत शक्ति उपासनेच्या "कौल" व "समय" अशा दोन मार्गांचा उल्लेख केला आहे. श्रीशंकराचार्यांनीं "सौन्दर्यलहरी"मध्यें म्हटलें आहे कीं लोकांना मोहांत टाकणारीं अशीं ६४ तन्त्रें श्रीशिवानें प्रथम सांगितलीं आणि मग एक ६५ वें तन्त्र, सकलपुरुषार्थसाधक असें, त्यानें निर्माण केलें.[१८] श्री गौडपादाचार्यांनींही ६४ तन्त्रांचा उल्लेख श्लोक १८ त केला आहे. काश्मीर ग्रन्थावलींत नुकताच "वामकेश्वरीमतम्" नांवाचा लहानसा ग्रन्थ प्रसिद्ध झाला आहे. त्यांत "वामकेश्वर तन्त्रा" चे पहिले पांच पटल आहेत व त्याच्यावरची जयरथाची टीका आहे. इ. स. च्या ११ व्या शतकाचा पूर्वार्ध हा त्याचा समय आहे. तो म्हणतो कीं, त्रिपुरोपासनेच्या मुख्य तीन शाखा होत्या; अथवा तीन मतें होतीं. एकाचे प्रवर्तक शंकरराशि, दुसऱ्याचे ईश्वर शिव व तिसऱ्याचे कल्याणवर्म; यांच्या मतांत बहुंशीं एकवाक्यता होती. काश्मीरांत या दोघांनीं त्रिपुरोपासनेचा प्रसार केला (वस्तुतो[१९] हि अस्य दर्शनस्य एतदेव आचार्यद्वयं काश्मीरेषु

---

१७ जातां जातां एक गोष्ट सांगावीशी वाटते. रॉलिन्सन्चें India नांवाचें पुस्तक नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे. त्यांत त्यानें ग्रीक ग्रन्थांच्या आधारानें लिहिलें आहे कीं, सॉक्रेटिसूच्या वेळीं आर्य तत्त्वज्ञानी ग्रीसला गेले होते व त्यांनीं सॉक्रेटीसाशीं चर्चा केली होती. तसेंच प्लेटोच्या तत्त्वज्ञानांत औपनिषद् ज्ञानाचा भाग आहे, असें सध्यांचे विद्वान् म्हणूं लागल्याचेंही रॉलिन्सन्नें नमूद केलें आहे.

१८ सुभगोदय श्लोक १८, ४२, ४३ इ० सौन्दर्यलहरी श्लोक-३१.

१९ [ ११ पृष्ठ ४८ ]

अवतारकम् ।) पैकीं ईश्वरशिवाचार्य इ. स. च्या ९ व्या शतकांत झाले. कारण ते अवन्तिवर्मा राज्य करीत असतांना श्रीशूरमठाचे अधिपति होते. या ईश्वरशिवांनीं "रसमहोदधि" नांवाचा ग्रन्थ केला असावा, अथवा "रसमहोदधि"- कर्त्यानें ईश्वरशिवांचे श्लोक उद्धृत केले असावेत. या 'रसमहोदधीं' त 'वामकेश्वर' तन्त्राचा अनुवाद केला होता असें दिसतें. म्हणजे सांगण्याचा सारांश इतकाच कीं इ. स. ९ व्या शतकाच्या अगोदर बरींच शतकें आगमग्रन्थ लोकांत प्रसिद्ध झाले होते. वामकेश्वरतन्त्राशिवायचे शाक्त आगमग्रन्थ म्हणजे ज्ञानार्णव, कुलार्णव, रुद्रयामल वगैरे होत.

इ. स. चें ११ वें शतक हें काश्मीरांतील शाक्तसंप्रदायाच्या इतिहासांत फार महत्त्वाचें आहे. अभिनवगुप्ताचा "तन्त्रालोक" इ. स. च्या १०१४ त लिहिला गेला. सोमशंभूनें "क्रियाकाण्डक्रमावलि" इ. स. च्या १०७३ त लिहिली. नंतर थोड्याच वर्षांनीं विद्यारण्यकृत "श्रीविद्यार्णव" हा प्रचण्ड ग्रन्थ तयार झाला. या ग्रन्थकारांनीं पूर्वकालीन आगमग्रन्थांतून उतारे उद्धृत केले आहेत. पुष्कळसे आगम आपल्याला प्रथमच अवलोकनांत येतात. या उताऱ्यांच्या योगानें तीन गोष्टी सिद्ध होतात. पहिली आगमांची विपुलता, दुसरी त्यांची प्राचीनता, आणि तिसरी त्यांचें प्रामाण्य.

"श्रीविद्यार्णवा" चा प्रथम "श्वास" ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचा आहे. श्रीविद्योपासकांच्या गुरुपङ्क्ति सांगतांना ग्रन्थकारानें आपली गुरुपरंपरा दिली आहे. तिच्यांत कपिल प्रथम असून शंकराचार्य ७१ वे आहेत. आपण समजत आलों आहोंत कीं गौडपादाचार्य हे शंकराचार्यांचे परमगुरु व गोविंद हे गुरु. पण या ग्रन्थकारानें गौडपादानन्तर पांच आचार्यांचीं नांवें देऊन सहावे शंकराचार्य सांगितले आहेत. (गौडादिशङ्करान्ताश्च सप्तसंख्या समीरिताः ॥ ११९ ) तसेंच आचार्यांचे सुरेश्वरादि चार मुख्य शिष्य अशी प्रसिद्धी आहे. हा ग्रन्थकार म्हणतो कीं मुख्य शिष्य १४ होते. (शंकराचार्यशिष्याश्च चतुर्दश दृढव्रताः ॥ ६० देव्यात्मानो दृढात्मानो निग्रहानुग्रहक्षमाः ।) त्यांपैकीं पांच भिक्षु व नऊ गृही होते. पांच भिक्षूंच्यामध्यें पद्मपादांचें नांव आहे; पण सुरेश्वर, हस्तामलक व त्रोटक यांचीं नांवें नाहींत. नऊ गृहींच्यामध्यें विष्णुशर्मा नांवाचे एक शिष्य होते. त्यांचे शिष्य प्रगल्भाचार्य व प्रगल्भांचे विद्यारण्य—ज्यांनीं हा ग्रन्थ रचला आहे.—बोधभिक्षूंचे शिष्य केरल देशांत विचरत होते; गृही मल्लिकार्जुनांचा शिष्यवर्ग विंध्यप्रदेशीं होता. त्रिविक्रमाचे पुरीकडे, श्रीधरांचे गौड, मिथिला व वङ्ग या देशांत आणि कपर्दींचे काशीअयोध्येकडे होते. ही सगळी माहिती अगदीं नवीन आहे.[20]

---

२० ऐतिहासिक दृष्ट्या या सर्व तपशीलाची सूक्ष्म परीक्षा होणें आवश्यक आहे. ग्रन्थकारानें आपली दिलेली परंपरा खरी मानल्यास तो शंकराचार्यांपासून चवथ्या पिढींत येतो. ग्रन्थाचे प्रस्तावनेंत म्हटलें आहे कीं, हा ग्रन्थ इ. स. १०७३ नंतर लिहिला गेला.

येथपर्यंत आपण भारतवर्षांतील आगमांचा विचार केला. अलीकडे बृहत्तर भारतांतील साहित्य उपलब्ध होऊं लागलें आहे. वैदिक संस्कृतीच्या अभिमान्यांनीं त्याचा अभ्यास अवश्य केला पाहिजे. पुष्कळसे जुन्या मताचे लोक म्हणत असतात कीं वैदिक धर्म आर्यावर्ताच्या बाहेर असूंच शकत नाहीं; पण हें मत प्राचीन इतिहासाच्या अज्ञानामुळें झालेलें आहे. आमची संस्कृति अमेरिकेपर्यंत जाऊन पोंचली होती असे पुरावे मिळाले आहेत. पण आतां हा विचार प्रस्तुत नाहीं. मला सध्यां एवढेंच सांगावयाचें आहे कीं शंकराचार्यपूर्वकाळांत वैदिक संस्कृतीचा प्रसार जावा, सुमात्रा, बलिद्वीप वगैरे दूरदूरच्या प्रदेशांत झाला होता.[२१] प्राचीन कंबुजचा राजा दुसरा जयवर्मा याच्या कालचा इ. स. ८०२ सालांतला लेख सांपडला आहे. त्यांत चार तन्त्रग्रन्थांचा उल्लेख आहे. त्यांचीं त्रुटित हस्तलिखितें नेपाळच्या दरबारी लायब्ररींत आहेत. तीं इ. स. च्या ८ व्या शतकांतल्या गुप्त लिपींत लिहिलेलीं आहेत. त्यांची निर्मिति दोनशें तरी वर्षे अगोदर झाली होती असें मानणें चूक होणार नाहीं. त्यांत आगमांविषयीं पुष्कळच अशी माहिती सांपडते कीं जिचा हल्लीं अगदींच लोप झाला आहे. या आगमांत शिवोपासना, शक्ति उपासना व योगमार्ग यांचें विवेचन आहे. उदाहरणार्थं, त्या लेखांत म्हटलें आहे कीं तुम्बुरु नांवाच्या चतुर्मुख शिवाचीं चार मुखें म्हणजे 'शिरच्छेद', 'विनाशिख,' 'सम्मोह' आणि 'नयोत्तर' हीं चार शास्त्रें होत. 'ब्रह्मयामल' या प्राचीन ग्रन्थांत सांगितलें आहे कीं शिवाच्या तीन शक्ति म्हणजे दक्षिण, वाम आणि मध्यम हे तीन 'स्रोत'. याशिवाय 'भैरव' वगैरे आणखीही दुसरे स्रोत आहेत. या स्रोतांपासून नाना प्रकारचे आगम, यामल व शास्त्रें निर्माण झालीं. शिवाच्या पांच मुखांपासून नानाप्रकारचीं तन्त्रें निर्माण झालीं. याशिवाय चार पीठें आहेतः– विद्यापीठ, मन्त्रपीठ, मुद्रापीठ आणि मण्डलपीठ यांपासून नानाप्रकारचे आम्नाय उत्पन्न झाले. निःश्वास– तत्त्वसंहिता नांवाच्या ग्रन्थांत शैवतन्त्रांची विस्तृत माहिती आहे. सम्मोह तन्त्रांत दशमहाविद्या व त्यांचीं पीठें यांची माहिती आहे. कादि–हादि हीं दोन मतें, त्यांचे वेगवेगळे आम्नाय व तन्त्रें, वगैरे सविस्तर सांगितलें आहे. याच सुमारास निर्माण झालेले ब्रह्मयामल, पिङ्गलमत व जयद्रथयामल हे ग्रन्थही खास अभ्यसनीय आहेत. शाक्त संप्रदायाच्या इतिहासांत या ग्रन्थांचें स्थान फार महत्त्वाचें आहे. आगमांच्या प्राचीनतेची प्रतीति हे ग्रन्थ वाचल्यानें निःसंशय होते.

---

असावा. या दोन गोष्टी परस्परसुसङ्गत दिसत नाहींत. मीं लेखांत या ग्रन्थाच्या कालाचा उल्लेख केला आहे तो केवळ प्रस्तावनालेखकाचा अनुवाद आहे. तें माझें निश्चित मत नव्हे.

२१ या पुढची माहिती श्री. प्रबोधचंद्र बागची यांच्या Studies in the Tantras, Part I नांवाच्या पुस्तकांतून घेतली आहे.

धार्मिक दृष्टि सोडली तरी ऐतिहासिक दृष्टीनेंहि या ग्रन्थसाहित्याचें फार महत्त्व आहे. वर उल्लेखिलेल्या इ. स. ८०२ च्या लेखांत म्हटलें आहे कीं जयवर्मा ( दुसरा ) यानें मध्यदेश–आर्यावर्त–येथून हिरण्यदाम नांवाच्या द्विजपुङ्गवाला बोलावून घेतलें व शिवउपासनेचा संप्रदाय स्थापन केला. देवराज नामक शिवलिङ्गाची स्थापना केल्यामुळें त्याला देवराजसंप्रदाय म्हणूं लागले. येथें खास लक्षांत घेण्यासारखी गोष्ट ही आहे कीं त्या काळीं आर्यावर्तांतील ब्राह्मणांनाच सर्वांहून श्रेष्ठ व म्हणूनच उत्तम गुरु समजत असत. नुकत्याच उल्लेखिलेल्या पिङ्गलमत ग्रन्थांत आर्यावर्ताच्या सीमा दिल्या आहेतः– "विन्ध्योत्तरगतेनैव मगधाश्चापरेण तु । हिमाद्रेर्दक्षिणे भागे पञ्चालात्पूर्वतस्तथा ॥ आर्यावर्त इति ख्यातः०। तन्त्रसारांत 'तथा विद्याधराचार्यधृतं जाबालवचनम् ।' असें म्हणून पुढील श्लोक दिले आहेत. त्यांत कोणत्या देशांतील गुरु उत्तम, कोणत्यांतील मध्यम व कोणत्यांतील अधम तें सांगितलें आहेः– "मध्यदेशकुरुक्षेत्र-लटकोंकण संभवाः । अन्तर्वेदिप्रतिष्ठानावन्तिजाश्च गुरूत्तमाः ॥ गौडाः शाल्वाः सुराश्चैव मागधाः केरलास्तथा । कोशलाश्च दशार्णाश्च गुरवः सप्त मध्यमाः ॥ कर्णाटनर्महाराष्ट्र कच्छतीरोद्भवास्तथा । कालिन्द्राश्च कलम्बाश्च काम्बोजाश्चाधमा मताः ॥ पिङ्गलमतांत म्हटलें आहे कीं आर्यावर्ताखेरीज अन्य देशांत जन्मलेले ब्राह्मण वर्ज्य आहेत; पण त्यांत विशेषतः 'कपूर्व' (म्हणजे 'क' या अक्षरानें त्याचें नांव सुरू होतें अशा ) देशांतले ब्राह्मण घेऊं नयेत. ते देश सात आहेत. त्यांचीं नांवें हीं:—कामरूप, काश्मीर, कलिङ्ग, कोङ्कण, काञ्ची, कोशल आणि कावेरीराष्ट्र. 'सम्मोहतन्त्रां' तही पुष्कळच भौगोलिक माहिती आहे. कादि–हादि मतें ज्या देशांत प्रचलित होतीं त्यांची लांबलचक यादी दिली आहे. तसेंच आणखी सांगितलें आहे कीं पूर्व–पश्चिम–दक्षिणोत्तर दिशाभेदानें तन्त्रांचे चार संप्रदाय आहेत. त्यांचीं नांवें केरल, काश्मीर, गौड आणि विलास. हे संप्रदाय कोणत्या देशांत प्रवृत्त झाले आहेत तें येणेंप्रमाणें सांगितलें आहे. "अङ्गादि-मालवन्तं च केरलः परिकीर्तितः । मद्रदेशं समारभ्य । वेणालान्तं महेश्वरि । काश्मीराख्यः संप्रदायः कथितः परमेश्वरि ॥ शिलहट्टं समारभ्य सैन्धवान्तं महेश्वरि । गौडमार्गो महेशानि कीर्तितस्ते मया तव ॥ विलासाख्यः संप्रदायः सर्वगः परिकीर्तितः ॥ ..." नंतर चीन, द्राविड, जैन केरल, काश्मीर आणि गौड या देशांत किती तन्त्रें व किती उपतन्त्रें प्रचलित होतीं ती संख्या सांगितली आहे. अस्तु.

याप्रमाणें इ. स. च्या ९ व्या शतकाच्या आरंभीं देवराज–संप्रदायाची सुरवात कंबुजांत झाली; पण तेथें शिवोपासना त्यापूर्वी दोनशें वर्षे तरी चालत आली होती. जयवर्मा (दुसरा) याचे कुलगुरु शिवकैवल्य हे परंपरागत शैव उपासक होते. प्राचीन चम्पा प्रांतांत शिवलिङ्गार्चन इ. स. च्या ४ थ्या शतकापासून, अथवा त्यापूर्वीपासून, चालत आलें होतें. यवद्वीपाबद्दलही असेंच विधान करतां येण्यासारखें आहे.

पूर्वी सांगितलें आहेच कीं शिवोपासना व योगमार्ग यांचा शाक्त उपासनेशीं घनिष्ट संबंध आहे. यांना प्रमाणभूत असे आगमग्रन्थही फार प्राचीनकाळापासूनचे उपलब्ध आहेत. काश्मीरांत शैवमार्गाचा प्रसार करणारे वसुगुप्त व सोमानन्द यांनीं स्वतः ग्रन्थ लिहिले आहेतच-हे परममाहेश्वरोपासक इ. स. च्या ९ व्या शतकांत होऊन गेले. वसुगुप्ताला 'शिवदृष्टि' नांवाचा ग्रन्थ शंकराच्या कृपेनें उपलब्ध झाला. सोमानन्दानें आपल्या पूर्वीच्या ग्रन्थांचा उल्लेख केला आहे. अकराव्या शतकांत झालेल्या अभिनवगुप्तानें प्रचण्ड ग्रंथसंपत्ति निर्माण करून ठेविली आहेच. पण त्यानें आपल्या अगोदरच्या कितीतरी ग्रन्थांचा उल्लेख जागोजागीं केला आहे. शैवप्रक्रियेचें शाक्त प्रक्रियेशीं पुष्कळच साम्य आहे. अभिनवगुप्तानें म्हटलें आहे "शैवीमुखमिहोच्यते"। म्हणजे शक्ति-उपासना ही शिवोपासनेचें मुख ( म्हणजे प्रारंभ ) आहे.

शिवोपासकांच्या प्रमाणें योगमार्गीयांचेही आगमग्रन्थ आहेत. योग म्हणजे काय या विषयींच्या सामान्य लोकांच्या कल्पना फार अस्पष्ट आहेत. योग हा एक मार्ग वा साधन आहे. संयुक्त म्हणजे एकरूप, अद्वय होणें हें साध्य म्हणजे शेवटचा टप्पा आहे. पण ही एकरूपता कुणाकुणाची व ती कशी घडवून आणावयाची या बाबतींत सिद्धान्तांची व प्रक्रियांची फार भिन्नता आहे. पातञ्जल योग, नाथपंथीयांचा योग, वेदान्त्यांचा योग, तान्त्रिकांचा योग हे सगळे वेगवेगळे मार्ग आहेत. त्यांतही कर्मयोग, भक्तियोग, ज्ञानयोग इत्यादि योगांच्या कल्पनांचें मिश्रण झाल्यानें जास्ती घोटाळा उत्पन्न झाला आहे. हे जे नानाप्रकारचे योग आढळून येतात त्यांपैकीं कांहीं योग फार प्राचीन आहेत. तन्त्रोक्त योग या प्राचीन योगांपैकींच एक आहे. तन्त्रोक्त योगांतही भेदोपभेद आहेत. उदा० काश्मीरी शैवपन्थाचा योगमार्ग त्रिपुरोपासनेंत जो योगमार्ग दृष्टीस पडतो त्याहून वेगळा दिसतो. श्री शंकराचार्यांनीं 'योगतारावलीं' त जो योग सांगितला आहे तो या दोहोंहून वेगळा आहे. ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायांतील योग हा एक वेगळाच प्रकार आहे. आणखीही बरेच प्रकार इतर ग्रन्थांतून आढळून येतात. अस्तु. सध्यां मला एवढेंच दाखवून देण्याचें आहे कीं शक्ति-उपासनेंत योग हें जें एक महत्त्वाचें अंग आहे तें फार प्राचीन आहे; आणि शक्ति-उपासना, शिवोपासना व योग या विषयींचे आगमग्रन्थ प्राचीन काळापासून सांपद्रायिकांमध्यें रूढ आहेत.

प्राचीन उपनिषदांत योगाचें अंधुक निदर्शन आहे. श्वेताश्वतरांत तें जास्ती स्पष्ट मागाहूनच्या उपनिषदांत पुष्कळ तपशील आहे. भगवद्गीतेच्या सहाव्या व चौदाव्या योगाचा स्पष्ट उल्लेख आहे. यानंतरच्या काळांत आल्यावर 'पातञ्जल योग- [illegible] केला पाहिजे. त्याबरोबर बौद्धविभाषादिकांचाही परामर्श घेतला पाहिजे. आणि पातञ्जल योगांत पुष्कळ स्थळें परस्पर सदृश आहेत. त्यांचें

चिकित्सक दृष्टीनें परीक्षण झालें पाहिजे. या सर्वांचा तान्त्रोक्त योगांशीं निकट संबंध आहे. बरेच योगी शाक्त–उपासक होते. ज्ञानेश्वरांचा योग हा शक्तिउपासनेचें अंग आहे. तें मीं अन्यत्र दाखविलें आहे. ज्ञानेश्वरांच्या परमगुरूंचे परमगुरु मत्स्येन्द्रनाथ यांना श्री शंकरांनीं क्षीराब्धीच्या उदरांत शाम्भवयोगाचें ज्ञान प्राप्त करून दिलें होतें. या मत्स्येन्द्रनाथांच्या नांवावर "कौलज्ञाननिर्णय" नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्यांत प्रतिपादन केलेलें ज्ञान व प्रक्रिया हीं आगमोक्त ज्ञान–प्रक्रियांशीं जुळतात. येथें एकच उतारा देतों:—

न शिवेन विना शक्तिर्न शक्तिरहितः शिवः ।
अन्योन्यं च प्रवर्तेते अग्निधूमौ यथा प्रिये ॥
न वृक्षरहिता छाया न छायारहितो द्रुमः ॥ ३०

अर्थ स्पष्ट असल्यामुळें विवेचन नको. ज्ञानेश्वरांच्या पूर्वीच्या पांचव्या पिढीचे मत्स्येन्द्रनाथ हे म्हणतात; म्हणजे हा संप्रदाय त्यांच्या पूर्वीच प्राचीन व प्रमाणभूत मानला गेला होता, असें अनुमान केल्यास तें चुकीचें ठरणार नाहीं.

बुद्धोत्तर व शंकरपूर्वकालांतील आगमग्रंथांचा येथवर विचार झाला. आतां या काळचीं पुराणें पहावयाचीं. वेदकाळापासून पुराणें प्रचलित आहेत असें परंपरा म्हणते. तीं वेदांच्या पुरवण्यांसारखीं होतीं असें वाटतें. जसे वेदविद् तसे पुराणविद् लोक पूज्य मानले जात होते. परंतु बुद्धपूर्वकाळांतील पुराणें सर्वथैव लुप्त झालीं आहेत नन्दकाळानंतर बुद्धोत्तरकाळांत बौद्धधर्माची जी जोराची क्रिया सुरू झाली तिची प्रतिक्रिया म्हणून वैदिकधर्माच्या पुनरुज्जीवनाचे प्रयत्न झाले; त्यांचें एक फल म्हणजे जुन्या पुराणांचा नवीन स्वरूपांत अवतार. त्यांचें पुढें गुप्तकाळांत द्वितीय संस्करण झालें. सध्यां जीं पुराणें उपलब्ध आहेत त्यांच्यापैकीं प्राचीन अशीं जीं समजलीं जातात, त्यांच्यांतला पुष्कळसा भाग या द्वितीय आवृत्तींतला आहे. गुप्तकाळीं व नंतरही नवीन पुराणें झालीं. अशा प्रकारचें हें पुराणसाहित्य फार मोठें आहे.

हीं पुराणें मुख्यतः शिव, देवी व विष्णु यांच्या उपासना व महात्म्यें, यांचें वर्णन करणारीं आहेत. याप्रमाणें उपास्यभेद असला तरी, बहुधा सर्व पुराणांत अशा दोन गोष्टी आढळून येतात कीं त्या प्रस्तुत प्रकरणीं फार महत्त्वाच्या आहेत. शक्तिमाहात्म्य ही पहिली गोष्ट; आणि त्या त्या उपासनेच्या अंगभूत योग, ही दुसरी गोष्ट. देवी ही प्रधानदेवता ज्या पुराणांनीं मानलेली आहे ती शक्ति–उपासनाप्रधान असणारच–यांत कांहीं विशेष नाहीं. शिवविषयक जीं पुराणें आहेत त्यांच्यांतही शक्तिउपासनेचें महत्त्व सांगितलें जाणें साहजिक आहे, कारण शिव–शक्तींचें ऐक्य, हा तर मूळ सिद्धान्त आहे. एकीशिवाय दुसरी उपासना सिद्धच होत नाहीं. पण विष्णुविषयक पुराणांतही, विष्णु व विष्णु–शक्ति यांचा अभेद वर्णिला आहे व विश्व म्हणजे विष्णूच्या अनंत

शक्तींचा प्रादुर्भाव असें म्हटलें आहे –– मला वाटतें पुष्कळांना ही गोष्ट माहीत नाहीं. जी गोष्ट शिव–विष्णूंची तीच गणपति इत्यादि इतर देवांची. कोणताही देव आपल्या शक्तीशिवाय कार्य करूं शकत नाहीं हें तत्त्व सर्व पुराणें शिकवितात. दोनच उदाहरणें देतों. "नैव शक्त्याविना कश्चित् शक्तिमानस्ति कारणम्। न च शक्तिमता शक्तिर्विनैकाप्यवतिष्ठते"॥ (अहिर्बुध्न्य संहिता ६३) "नित्यैव सा जगन्माता विष्णोः श्रीरजपायिनी। यथा सर्वगतो विष्णुस्तथैवेयं द्विजोत्तम"॥ (विष्णुपुराण १, ८, १५) सारांश, शक्ति, शिव, विष्णु इ० देवांच्या उपासना या सगळ्या अद्वैत-बोधक आहेत.[२२] पाञ्चरात्रागमांत अद्वैत आहे तें अनुवादरूपानें वैष्णवपुराणांत दिसून येतें. देवीविषयक पुराणें म्हणजे, कालिकापुराण, देवी भागवत व त्रिपुरा–रहस्य–माहात्म्य खण्ड हीं संपूर्णतया शक्तिमहिमा वर्णन करणारीं आहेत. यांशिवाय मार्कण्डेय पुराणांतील देवीमाहात्म्य अथवा सप्तशती, ब्रह्माण्डपुराणांतील ललितासहस्रनाम प्रकरण, सूत-संहितेच्या यज्ञवैभव खण्डांतील शक्तिस्तोत्र, इत्यादि प्रकरणेंहि फार महत्वाचीं आहेत.

मागें सांगितलेंच आहे कीं योग हें शक्तिउपासनेचें एक प्रधान अंग आहे. कांहीं कांहीं पुराणांतून योगाविषयीं फार चांगली माहिती दिलेली आहे. उदा० वायुपुराणांत, पाशुपतयोगाचें वर्णन आहे. विष्णु वगैरे इतर कांहीं पुराणांतूनही तत्तदुपासानानुकूल योगप्रक्रिया सांगितल्या आहेत.

आतां शक्तिसाहित्याचा चौथा वर्ग जें स्तोत्रसाहित्य त्याचें संक्षिप्त अवलोकन करूं. देवतेच्या स्तुतिपर भक्तानें केलेलें कवन म्हणजे स्तोत्र, अशी साधारणपणें स्तोत्राची व्याख्या करतां येईल. भक्तीच्या उद्रेकांत स्तोत्राची निष्पत्ति होते. हल्लीं ज्यांना आपण स्तोत्रें समजतों तशीं स्तोत्रें वैदिककाळीं नसावींत असें वाटतें, वेदांत देवतांची स्तुति आहे. पण आपण हल्लीं मानतो त्या भक्तीचा अंश फार कमी आहे. वेदांचें पर्यवसान कशांत याविषयीं दोन मतें आहेत. पूर्वमीमांसकांच्या मतें वेदांची प्रवृत्ति यज्ञाकरितां आणि यज्ञांचें फल इष्टप्राप्ति अथवा स्वर्गप्राप्ति–पूर्वमीमां-सकांच्या अशा प्रकारच्या कर्मकाण्डांत भक्तीचा भाग फारच थोडा आहे. उत्तर-मीमांसकांच्या मतीं वेदांचें पर्यवसान वेदान्तांत म्हणजे उपनिषदुक्त ज्ञानांत, म्हणून यांना वेदान्ती म्हणतात. मुख्य जीं दहा उपनिषदें आहेत त्यांत भक्तीचा ओलावा सांपडणें

---

२२ डॉक्टर प्रभातचंद्र चक्रवर्ती हे आपल्या Doctrine of Śakti in Indian Literature नांवाच्या प्रबंधांत म्हणतात, "We are simply struck with wonder to see how strictly the Pāncaratrātragama has maintained the non-dualistic standpoint by co-ordinating Sakti and Saktimat into a harmonious and indivisible unity." (पृ० १०८)

कठीणच आहे. सांगण्याचा सारांश असा कीं, वेदकालीन कर्मज्ञानांत आपण साधारणतः समजतों त्या भक्तीचें प्रमाण फार कमी आहे, अथवा नाहीं सारखें आहे.[२३] महाभारतकाळीं याच्याविरुद्ध प्रतिक्रिया सुरू झाली होती. त्रयीधर्म हा काम्य आहे म्हणून तो टाकावा; त्रयीधर्मांच्या योगानें जन्ममरणाचे फेरे चुकत नाहींत. म्हणून काम्य त्रयीधर्म सोडून निष्काम नित्यनैमित्तिक स्वरूपाचा स्वधर्म आचरावा. निष्कामता एकदम साधणें अवघड आहे, म्हणून ईश्वरार्पण बुद्धीनें कर्म करण्याची संवय पाडावी, म्हणजे ईश्वर बुद्धियोग देतो, तेणेंकरून ज्ञान उत्पन्न होऊन जेथून पुनरावृत्ति नाहीं अशा पदाची प्राप्ति होते. सर्व कर्में ईश्वरार्पण करणें ही भक्ति, या रूपाच्या भक्तिविशेषाचें स्पष्ट वर्णन आपल्याला प्रथम भगवद्गीतेंत म्हणजे महाभारतांत सांपडतें. पाञ्चरात्र आगमोक्त भक्तीचें मूळ शान्तिपर्वांतील नारायणीय उपाख्यानांत आढळतें. अशा प्रकारें भक्तीची सुरवात महाभारतकाळापासून झाली असें म्हणावयांस हरकत नाहीं. पण या भक्तिमार्गाचें एक अंग म्हणून स्तोत्रें रचावयाची सुरवात झाली असें म्हणतां येईलसें वाटत नाहीं. महाभारतांत दोन ठिकाणीं देवीस्तुति आहे. शान्तिपर्वांत प्रसिद्ध भीष्मस्तवराज आहे, पुढें

---

२३ थोडीशी ओढाताण करून अर्थ केल्यास उपनिषदांतून भक्तीच्या मूळाचा शोध लावतां येईल. उपनिषदांत ब्रह्माचें सगुणत्व सांगून त्याची उपासना सांगितली आहे आणि उपासना म्हणजे भक्तिविशेष म्हणतां येईल. प्रसिद्ध वचनः-' नायमात्मा प्रवचनेन लभ्यः ......यमेवैष वृणुते तेनैव लभ्यः ॥ तस्यैष आत्मा वृणुते तनूं स्वाम् । '' यांत ईश्वरानुग्रहाचें मूळ आहे असें म्हणतां येईल. शाण्डिल्यसूत्र १·१·३ यावर टीका करतांना नारायणतीर्थानें आपल्या 'भक्तिचन्द्रिकेंत हें वचन ईश्वरानुग्रहाच्या सिद्धान्ताचा एक मुख्य आधार म्हणून उद्धृत केलें आहे. 'मुण्डकां' तील प्रसिद्ध 'द्वा सुपर्णा०' हें रूपक, जीवेश्वरांचा भेद दाखवून जीवानें ईश्वरभक्ति केल्यास तोहि दुसऱ्याप्रमाणें केवळ द्रष्टृत्व प्राप्त करून घेऊं शकतो असा सिद्धान्त शिकवितें असें म्हणतात. परंतु मला वाटतें कीं कोणत्याहि विशिष्ट देवतेला ब्रह्मत्व दशोपनिषदांतील एकानेंही दिलें नाहीं; म्हणून विशिष्ट देवतेचें उपासन त्यांत नाहीं—आणि भक्तिमार्गांत कोणीतरी एक विशिष्ट देवता उपास्य म्हणून मानावी लागते. ज्ञानी वेदान्ती 'जन्माद्यस्य यतः।' (ब्र.सू. १,१,२) हें ब्रह्माचें लक्षण मानतात; हेंतीं भक्त हेंच आपल्या उपास्याचें समजतात. याचा उगम श्वेताश्वतरोपनिषदांत सांपडतो. तेथें महेश्वराला मायिन् व त्याच्या प्रकृतीला माया असें म्हटलें आहे व शिवभक्तिमूलक आत्मज्ञान वर्णिलें आहे. त्यांत शिव-ब्रह्माचें ऐक्य आहे. याच धर्तीवर पुढें रामतापिनी, गोपाल-तापिनी, नृसिंहतापिनी, त्रिपुरातापिनी वगैरे उपनिषदें आविर्भूत झालीं व त्यांनीं भक्तिमार्गाची विशेष परिस्फुटता केली. पण हीं सर्व उपनिषदें मागाहूनचीं आहेत—म्हणून माझें मत झालें आहे कीं वैदिक साहित्यांत भक्तीचें मूळ असलेंच तर फार सूक्ष्म आहे.

अनुशासन पर्वांत एक शिवसहस्रनाम आहे. पण आपण सध्यां जी नवविधा अथवा प्रेमलक्षणा भक्ति मानतों तिच्या अनुषंगानें या स्तुतींची रचना झाली होती असें ठाम सांगतां येणें अवघड आहे. भारतानंतरच्या काळांत शाण्डिल्यसूत्रें, नारदसूत्रें वगैरे सूत्रसाहित्याची निर्मिति झाली. पुढें बुद्ध व महावीर यांचे पन्थ निघाले. त्यांच्या शिकवणुकींत आरंभीं तरी भक्तीला फारसा वाव नव्हता. बुद्धोत्तर काळीं मूर्तिपूजा व योग यांचा प्रचार जास्ती प्रमाणांत सुरू झाला. तेव्हांपासून भक्तिमार्गानें लोकांचें लक्ष आपलेकडे विशेष रीतीनें ओढून घेतलें. मूर्तिपूजा आणि भक्ति यांचा घनिष्ठ संबंध आपल्याला सहज समजण्यासारखा आहे. मूर्तिपूजेबरोबर भक्तिमार्गाची वाढ होणें साहजिक होतें. तसेंच सर्व कर्मं ईश्वरार्पण करणें ही भक्ति चित्तवृत्तिनिरोधरूप योगाचें एक साधन आहे असें पातञ्जल योगसूत्रांत सांगितलें आहे. हीं योगसूत्रें बुद्धोत्तर काळांतील आहेत हें सर्वमान्य आहे. याप्रमाणें बुद्धोत्तर काळापासून भक्तिमार्गीय साहित्याची निर्मिति होऊं लागली.[२४] पण स्तोत्ररूपाचें जें भक्तिमार्गीय साहित्य हल्लीं विस्तृत प्रमाणांत उपलब्ध आहे त्याची सुरवात फार उशिरानें झाली असें म्हणावें लागतें.

शंकराचार्य हे जसे अद्वैततत्त्वज्ञानाचे आद्यप्रस्थापक, तसेच ते स्तोत्रसाहित्याचेही प्रथमपुरुष (Pioneer) म्ह० आद्यप्रवर्तक होत असें म्हणतां येईल कीं नाहीं तें संशयास्पद आहे. बऱ्याच विद्वानांनीं मान्य केलेला त्यांचा काल म्हणजे इ. स. च्या ९ व्या शतकाचा प्रारम्भ (इ. स. ७८८–८२०) हा आहे. तेलंग, लो. टिळक वगैरेंना हें मान्य नाहीं. तेलंगांच्या मतें ६ वें शतक व टिळकांच्या मतें ७ वें शतक आहे. ९ व्या शतकांत ते झाले असें मानलें तर, हा आद्यप्रवर्तकत्वाचा मान त्यांना देतां येत नाहीं. सध्यां इतर देवतांच्या स्तोत्रांविषयीं न सांगतां फक्त देवीस्तोत्रांबद्दलच सांगावयाचें म्हटलें तर ९ व्या शतकाच्या पूर्वीचीं कांहीं स्तोत्रें प्रसिद्ध आहेत. प्रथम बाणभट्टाचें 'चण्डीशतक' घ्यावें लागेल. त्याचा सासरा मयूरकवि यानें " सूर्यशतक ' रचिलें; त्या स्पर्धेनें बाणानें 'चण्डीशतक' केलें. बाण, मयूर व मातंग–दिवाकर हे हर्षाचे सभ्य होते; असें जह्लणाच्या 'सूक्तिमुक्तावलीं' तील एका श्लोकावरून दिसतें. म्हणजे ७ व्या शतकाचा पूर्वार्ध, हा बाणाचा समय झाला. ज्यांचा समय नक्की सांगतां येत नाहीं, अशीं आणखीं दोन स्तोत्रें आहेत. एक मूककविकृत 'पञ्चशती'. हा कवी जन्मतः मुका होता. पुढें देवीच्या कृपेनें वाचा फुटली आणि त्यानें काञ्चीच्या कामाक्षी देवीची स्तुति ५०० श्लोकांत केली. नंतर त्यानें पुन्हा मूकत्व मागून घेतलें आणि त्या भक्तिसुखांत उर्वरित काळाचें क्षेपण केलें. हे श्लोक फार गोड आहेत. आर्याशतक, पादारविन्दशतक, स्तुतिशतक, कटाक्षशतक आणि मन्दस्मितशतक असे मिळून ५०० श्लोक आहेत त्यांत त्रिपुरोपासनेच्या

---

२४ बौद्ध व जैन साहित्यावरूनहि असें दिसून येतें कीं बुद्धमहावीरानंतर कांहीं शतकांनीं भक्तिमार्गाचीं तत्त्वें त्यांच्या संप्रदायांत प्रविष्ट झालीं.

प्रक्रियेचा व योगाचा ठिकठिकाणीं उल्लेख आहे. 'सौन्दर्यलहरी' च्या एका श्लोकांत या मूककवीचा उल्लेख असावा असें मला वाटतें.[२५] तें तसें असल्यास हा कवि शंकराचार्यांहून प्राचीन ठरतो. कुंभकोणमूच्या कामकोटिपीठाच्या परंपरेप्रमाणें आद्य-शंकराचार्य इ. स. पूर्वी ४७७ मध्यें समाधिस्थ झाले. त्यांच्या मागून कामकोटिपीठावरचे २० वे शंकराचार्य मूकार्भकशंकराचार्य नांवाचे इ. स. ३९६ ते ४३६ पर्यंत होते. त्यांनीं ही 'पञ्चशती' केली असें कांहीं विद्वान् मानतात. हा वाद आपल्याला सध्यां नको.

दुसरी एक या दोहींहून फार सुंदर अशी देवस्तुति आहे तिचें नांव 'लघुपञ्चस्तवी.' तिचें कर्तृत्व कालिदास, शंकराचार्य, लघुभट्टारक, धर्माचार्य इत्यादि वेगवेगळ्या जणांकडे दिलें जात आहे. बाणभट्ट व मूककवि या दोहोंच्या कृतींपेक्षां ही 'लघुपञ्चस्तवी' प्राचीनतर आहे असें मला वाटतें आणि सरसतेच्या दृष्टीनें पाहिल्यास आतापर्यंतच्या सगळ्या स्तोत्रांत तिच्या जोडीला बसण्याजोगें एकही नाहीं असेंहि मला वाटतें. लघुस्तव, चर्चास्तव, घटस्तव, अम्बास्तव आणि सकलजननीस्तव अशा पांच स्तवांची ही पंचस्तवी आहे. एकंदर श्लोक १३२ आहेत. त्रैपुर सिद्धान्तानुसार देवीची स्तुति केली आहे. मूकपञ्चशतींत आहे त्याप्रमाणें ठिकठिकाणीं त्रैपुरप्रक्रिया व योग यांचे उल्लेख आहेत. अर्थ न कळला तरीही गुणगुणत बसावेंसें वाटण्याइतका गोड 'सुवर्णपदविन्यास' त्यांत आहे. या लघुपञ्चस्तवीला ऐतिहासिक दृष्टीनें बरेंच महत्त्व आहे. पहिल्या लघुस्तवांत श्लोक १२ हा आहे—

जातोऽप्यल्पपरिच्छदे क्षितिभुजां सामान्यमात्रे कुले
निःशेषावनिचक्रवर्तिपदवीं लब्ध्वा प्रतापोन्नतः ।
यद्विद्याधरवृन्दवन्दितपदः श्रीवत्सराजोऽभवत्
देवि त्वच्चरणाम्बुजप्रणतिजस्तेऽयं प्रसादोदयः ॥

यांत म्हटलें आहे कीं एका सामान्यमात्र राजकुलांत जन्मलेला वत्सराजा देवीच्या कृपेनें प्रतापी चक्रवर्ती झाला व विद्याधरवृन्द त्याला नमस्कार करीत असे. दुसऱ्या चर्चास्तवांतील ६ वा श्लोक असाः—

पृथ्वीभुजोऽप्युदयनप्रभवस्य तस्य
विद्याधरप्रणति चुंबित पादपीठः ।
तच्चक्रवर्तिपदवीप्रणयः स एष
त्वत्पादपंकजरजःकणजः प्रसादः ॥

येथें कवि असें सांगतो कीं, चक्रवर्ती उदयनाचा पुत्र देवीच्या प्रसादानें विद्याधरांचा चक्रवर्ती झाला. याचें नांव नरवाहनदत्त होतें. गुणाढ्याची 'बृहत्कथा' वत्सराजा

---

२५. १०० वा श्लोक अड्यार प्रत.

व नरवाहनदत्त यांच्या–विशेषतः नरवाहनदत्ताच्या–कथांनींच भरलेली आहे. या अति-प्राचीन उल्लेखांमुळें पञ्चरत्नवीही बरीच प्राचीन असावी असें मानण्याकडे मनाचा कल होतो. तसें ठरल्यास दुसऱ्या एका गोष्टीची प्राचीनता आपोआप सिद्ध होते. त्रिपुरोपासना, तदंगभूत मन्त्र, योग यांच्या प्रक्रिया या सर्व गोष्टी बुद्धपूर्वकाळींही प्रचलित होत्या असें ठरतें. कारण वत्सराजाचा समय बुद्धाच्या अगोदरचा आहे. तसेंच ज्याअर्थी ही उपासना वत्सराजाच्या वेळीं प्रचलित होती त्याअर्थी तिचा प्रारंभ वत्सराजाच्या पूर्वी कांहीं शतकें तरी झाला होता असें मानणें भाग आहे. अशा प्रकारें त्रिपुरोपासना ही फार प्राचीन काळापर्यंत जाऊन पोंचते.

शंकराचार्यांच्या नांवावर पुष्कळ स्तोत्रें प्रसिद्ध आहेत. त्यांनीं अनेक देवतांची स्तुति केली आहे. तीं सगळीं स्तोत्रें आद्य शंकराचार्यकृतच आहेत असें म्हणतां येत नाहीं. देवीविषयक स्तोत्रांपुरतें बोलावयाचें म्हटलें तर, पहिली गोष्ट एकदम दिसून येते ती ही– ते शाक्तसंप्रदायी त्रिपुरोपासक होते, असें स्पष्ट सिद्ध करणारीं स्तोत्रें बरीच आहेत. त्यांनीं स्थापन केलेल्या मठांतून श्रीचक्रार्चन परंपरेनें अजूनपर्यंत चालूं आहे. एका तीर्थाचे ठिकाणीं त्यांनीं श्रीचक्रोद्धार केला अशी आख्यायिका आहे. म्हणून त्रिपुराविषयक स्तोत्रें त्यांनीं रचिलीं असण्याचा संभव आहे. त्रिपुरसुंदरी वेदपादस्तोत्र, त्रिपुरसुंदरी मानसपूजास्तोत्र आणि देवीचतुःषष्ट्युपचारपूजा स्तोत्र हीं मोटीं स्तोत्रें असून शिवाय लहान लहान कांहीं स्तोत्रें आहेत. या सर्वांपेक्षां फार प्रसिद्ध स्तुति म्हणजे "सौंदर्यलहरी".[२६] शक्तिमहिमावर्णनपर हें स्तोत्र फार लोकप्रिय आहे. याच्यावर ४० हून जास्ती टीका झाल्या आहेत. त्यांपैकीं ३० उपलब्ध आहेत. हें सर्व स्तोत्र रहस्यमय आहे. त्यांत मंत्रोद्धार, पूजारहस्य, अद्वैततत्त्वज्ञान, हें सगळें कांहीं आहे. या स्तोत्राच्या लोकप्रियतेची दुसरी खूण ही आहे. "सौंदर्यलहरी" चें अनुकरण करून इतरांनीं मागाहून दुसऱ्या 'लहरी' रचिल्या आहेत. आनन्दलहरी, दत्तलहरी, लक्ष्मीलहरी इत्यादि. जुन्या हस्तलिखितांच्या संग्रहांत अशा १४ लहरींचीं नांवें मीं पाहिलीं आहेत; यांपैकीं कांहीं लहरी छापल्या आहेत.

या स्तोत्रांशिवाय रुद्रयामल वगैरे कांहीं आगमग्रंथांत सहस्त्रनामें व स्तुति दिल्या आहेत. भागवतादि पुराणांतही कृष्ण, रुद्र वगैरेंची स्तुति आहे. ९ व्या शतकापर्यंत जीं गद्य–पद्य–काव्यें लिहिलीं गेलीं आहेत त्यांच्यांत कांहीं ठिकाणीं देवस्तुति आहे. उदा० कालिदासाच्या 'रघुवंशांत' १० व्या सर्गांत विष्णुस्तुति आहे. 'किराता'च्या शेवटच्या

---

२६ "सौन्दर्य–लहरी" आद्यशंकराचार्यांची आहे कीं काय याविषयीं मला शंका आहे. पण लक्ष्मीधरासारख्या प्राचीन टीकाकारानें तिचें कर्तृत्व त्यांना दिलें आहे. बाकीचे बहुतेक टीकाकार, दोन तीन वगळून, लक्ष्मीधराच्याच मताचे आहेत. हा वाद सध्यां अप्रस्तुत असल्यामुळें बहुमान्य समजुतीला अनुसरून मी सध्यां लिहीत आहे.

सर्गांत शिवस्तुति आहे. 'माघा'त भीष्मकृत कृष्णस्तुति आहे. त्यांत विष्णूच्या अवतारांचा निर्देश आहे. या स्तुत्यांचा शाक्त उपासनेशीं प्रत्यक्ष संबंध नाहीं; पण, ही उपासना ज्यांच्यावर आधारलेली आहे त्या तत्त्वज्ञानाविषयीं व योगाविषयीं कांहीं जाणण्याजोगी माहिती तेथें आपोआप मिळते.

मीं जे तीन कालखण्ड कल्पिले होते त्यांपैकीं पहिल्या व दुसऱ्या खण्डांतल्या शाक्त साहित्याचें धांवतें अवलोकन येथपर्यंत झालें. त्या सगळ्याचा सारांश असाः— बुद्धपूर्व काळांत शक्ति-उपासना होती, पण ती बीजरूपानें प्रकट झाली नव्हती; फक्त सांप्रदायिकांमध्यें परंपरेनें चालू राहिली होती. बुद्धाच्या पूर्वीं कांहीं शतकें निर्गुण वा सगुण ब्रह्माच्या जागीं ईश्वरोपासना सुरू झाली. हा ईश्वर म्हणजे ब्रह्मरूपच, पण साकार— जसा 'श्वेताश्वतरां' तला रुद्र. रुद्राप्रमाणें शक्ति व विष्णु यांनांहि ईश्वर समजत असत. बुद्धोत्तर काळांत या ईश्वरोपासनेचा विकास झाला. मुळांत जें बीज होतें त्याचा मोठा वट वृक्ष झाला, व आरंभाच्या तीन शाखांना दुसऱ्या उपशाखा फुटल्या. शिव, शक्ति व विष्णु या देवता विविध स्वरूपांत अवतीर्ण झाल्या—गणपति, स्कन्द, भैरव, रुद्राणी, ब्रह्माणी महालक्ष्मी, दुर्गा, राम, कृष्ण, दत्त इत्यादि — आणि यांच्या उपासनांसाठीं आगमादि विस्तीर्ण साहित्य अवतीर्ण झालें. शंकराचार्यांच्या काळापर्यंत उपास्य दैवतांची संख्या बरीच वाढली होती. मूर्तिपूजेची सुरुवात झाल्यामुळें ठिकठिकाणीं उपास्य मूर्तींची स्थापना झाली व पवित्र तीर्थक्षेत्रें अस्तित्वांत आलीं. दक्षिणेंतील मोठमोठीं मन्दिरें, वेरूळचीं लेणीं, वगैरे शिल्पसाहित्य या काळांतलें आहे.

उपास्यांचे प्रकार अनेक झाले; पण मूलभूत तत्त्वज्ञानांत तशा प्रकारचें वैविध्य उत्पन्न झालें नाहीं. आगमग्रन्थ पुष्कळ; पण आगमोक्त तत्त्वज्ञान मुख्यत: तीन प्रकारचें. शिव, शक्ति आणि विष्णु या उपास्यभेदानुसार त्यांचीं त्यांचीं तत्त्वज्ञानें भिन्न आहेत. शैवउपासकांचे दोन मुख्य संप्रदाय झालेले दिसतात. एक अगदीं उत्तरेकडील काश्मीरच्या शैवांचा व दुसरा अगदीं दाक्षिणेकडील पाण्ड्यकेरळ—देशीय शैवांचा. काश्मिरी शैवांचेही तीन पोटभेद आहेत—अद्वैती, विशिष्टाद्वैती आणि द्वैती. दाक्षिणात्य शैव विशिष्टाद्वैती आहेत असें वाटतें. त्यांच्या ग्रंथांचा अभ्यास मी अजून पुरा केला नाहीं, म्हणून निश्चित कांहीं सांगूं शकत नाहीं. शाक्तउपासनेंतहि थोडासा असा प्रकार आढळतो. त्रैपुर उपासना ही मुख्यतः दाक्षिणात्यांची—शंकराचार्यांनीं तिचा प्रसार केला असें म्हणावयास हरकत नाहीं. म्हणून त्रैपुर सिद्धान्त अद्वैत सिद्धान्ताशीं पुष्कळ जमतो. ध्येय अगदीं एकच. फरक आहे तो तपशिलाचा व उपासनाप्रक्रियेचा. ही उपासना उत्तरेकडे काश्मिरांत गेली; तेथें ती अद्वैती शैवांच्या उपासनेशीं एकरूप झाली. विशिष्टाद्वैती व द्वैती शैवांनीं मात्र अद्वैताचें ध्येय सोडून दिलें व आपापलीं विशिष्ट ध्येयें निश्चित केलीं; पण, तत्त्वज्ञान

आणि प्रक्रिया हीं अद्वैती शैवांचींच ठेवली. इतर प्रांतांत वेगळा प्रकार दिसतो. आरंभीं तरी त्रैपुर–उपासनेचा प्रवेश काश्मिराहून अन्य प्रांतांत झाला होता असें वाटत नाहीं– निदान तसा पुरावा उपलब्ध असल्याचें माहीत नाहीं. काली, तारा, छिन्नमस्ता या देवतांची उपासना तेथें आरंभीं असावी. बौद्ध लोकांत या उपासना जुन्या काळीं होत्या आणि मिथिला, मगध, अंग, वंग इत्यादि देशांत बौद्ध धर्मांचा प्रसार झाला होता; म्हणून बौद्धांकडून या उपासना वैदिकांनीं घेतल्या व आत्मसात् केल्या असें अनुमान केलें पाहिजे असें मी म्हणत नाहीं. माझ्या सांगण्याचा आशय एवढाच आहे कीं, त्रिपुरा ही त्या प्रांतांतील लोकांची मूळ उपास्य देवता नव्हती असें वाटतें. अद्वैत तत्त्वज्ञान हें फक्त त्रिपुरोपासनेंतच आहेसें दिसतें; कारण ही उपासना ज्ञानप्रधान आहे. पण हें शुष्क, नीरस, निर्गुण ज्ञान नव्हे; भक्तियुक्त ज्ञान आहे.[२७] असो. शक्तीच्या इतर स्वरूपांच्या उपासना भक्तिप्रधान आहेत. ज्ञान व भक्ति हीं परस्परविरोधी आहेत असें माझें म्हणणें आहे असा गैरसमज कोणी करून घेऊं नये. मानवस्वभावानुसार, साध्य एकच असतांहि साधनांची गौणता व प्रधानता पहावयाची असते एवढेंच माझें म्हणणें आहे. मानवस्वभावाचे दोन प्रकार आहेत. एक शिवतत्त्वप्रधान असतो. असा मनुष्य मुख्यतः बुद्धिवादी असतो. हा ज्ञानाला प्राधान्य देईल. पण त्याच्यांत श्रद्धा अथवा भक्ति नसते असें नव्हे. दुसरा शक्तितत्त्वप्रधान असतो. असा मनुष्य मुख्यतः भावनाशील असतो. हा श्रद्धा–भक्तीला प्राधान्य देईल. पण त्याच्यांत ज्ञान नसतें असें नव्हे. असो. याचा अधिक विचार सध्यां अप्रस्तुत आहे.

शंकराचार्यांच्या काळापर्यंतचा विचार येथवर झाला. त्यापुढच्या काळाबद्दलचा विचार थोडा वेगळ्या तऱ्हेनें केला पाहिजे. इ. स. च्या ९ व्या १० व्या शतकापासून हिंदुस्थानांत प्रान्तीयतेचा उगम होऊं लागला होता. मराठी व कानडी भाषा प्रौढ होऊं लागल्या होत्या. कारण इ. स. ११ व्या शतकापासून त्यांच्यांत ग्रंथरचना होऊं लागली. तामिळ भाषेंत यापूर्वीं पासूनचें वाङ्मय होतेंच. इ. स. १० व्या शतकांत गुजराथेंत मूळराजाच्या कारकीर्दींत उत्तरेकडील ब्राह्मणांची आयात मोठ्या प्रमाणांत झाली व गुर्जर संस्कृतीचा प्रारंभ झाला. इ. स. ११ व्या शतकापासून मुसलमानांच्या स्वाऱ्या एकसारख्या होऊं लागल्या. त्यानंतर हिंदी भाषेची सुरवात झाली. पूर्वेकडे बंगाली भाषाहि प्रौढ होत होती. काश्मिरांत जुनी संस्कृति तद्देशीय भाषेंत येण्याच्या तयारींत होती. अशा

---

२७ अद्वैतांत भक्तीला वाव नाहीं म्हणणाऱ्यांनीं हीं वचनें पहावींतः– देहबुद्ध्या तु दासोऽहं जीवबुद्ध्यात्वदंशकः । आत्मबुद्ध्या त्वमेवाहं इति मे निश्चिता मतिः ॥ असें भक्त आपल्या इष्ट उपास्याला सांगत आहे. तसेंच शंकराचार्य म्हणतातः–सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वम् । सामुद्रो हि तरंग क्वचन समुद्रो न तारंगः ॥ आचार्य भक्त नसते तर त्यांच्याकडून स्तोत्रनिर्मिति झालीच नसती.

प्रकारें प्रान्तीय वाङ्मयाला हळूहळू सुरवात होत होती. म्हणून मी मानलेल्या तिसऱ्या काळांतला, ह्या संप्रदायाचा इतिहास लिहिणें झाल्यास, त्या त्या प्रान्तांत त्या त्या उपासनांचा प्रसार कसा कसा झाला तें प्रान्तवार लिहिणें सोईचें होईल असें मला वाटतें. तें सध्यां शक्य नाहीं.

मला वाटलें होतें त्यापेक्षां हा लेख पुष्कच लांबला आहे; तथापि तें अनिवार्य होतें. बऱ्याच गोष्टी मला सूत्ररूपानें सांगाव्या लागल्या आहेत. तरी पण ही संधि भारत–इतिहास–संशोधक–मंडळानें मला दिली याबद्दल मण्डळाच्या कार्यकर्त्यांचे अन्तःकरणपूर्वक आभार मानतों.

---

## ३ काण्व – साम्राज्य

( लेखकः— श्री. नारायण श्रीनिवास राजपुरोहित
इतिहास–संशोधक, धारवाड )

ह्या लेख इतिहास–संशोधनात्मक आहे. मौर्य साम्राज्य, शुंग–साम्राज्य व काण्व–साम्राज्य हीं तीनहि ख्रिस्ताच्या पूर्वकालीं होऊन गेलीं आहेत. हें इतिहासप्रसिद्धच आहे. मौर्य–साम्राज्य (ख्रि. पू. ३२२–१८५), शुंग–साम्राज्य (ख्रि. पू. १८५–७३) व काण्व–साम्राज्य (ख्रि. पू. ७३–२८). हीं साम्राज्यें वायु, मत्स्य, विष्णु व भागवत ह्या चारहि पुराणांत कीर्तित झालीं आहेत. त्यापैकीं काण्व–साम्राज्याबद्दल उल्लेख करितांना श्री. व्ही. एस्. बखले, M. A, LL B. यांनीं जर्नल ऑफ दी रॉयल एशियाटिक सोसायटी बॉंबे ब्रँचच्या मे १९२८ च्या (Vol. VII) नं. १ व २ पान ४६ वर काण्व ब्राह्मण राजांच्या संबंधीं हे राजे "काण्वायन" गोत्राचे ब्राह्मण होते असें सांगितलें आहे. परंतु ते तसे काण्वायन गोत्राचे ब्राह्मण नसून शुक्ल यजुर्वेदांतर्गत काण्व शाखीय ब्राह्मण होते हें सप्रमाण दाखविण्याचा ह्या लेखाचा उद्देश आहे.

प्रारंभीं हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं; (१) कण्व, (२) काण्व व (३) काण्वायन हीं तिन्हीं गोत्रें अगदीं भिन्न भिन्न आहेत. त्याला मुख्य आधार म्हणजे पुरुषोत्तम–विरचित "गोत्रप्रवर–निबन्ध–कदम्बम् ।" अथवा "गोत्रप्रवरमञ्जरी ।" हा प्राचीन ग्रंथ होय. हा ग्रंथ 'म्हैसूर ओरिएंटल् लायब्ररी' या संस्थेनें इ० स० १९०० मध्यें व लक्ष्मीव्यंकटेश मुद्रणालय कल्याण, मुंबई येथें इ० स० १९१७ मध्यें प्रसिद्ध केला आहे.

आणि प्रक्रिया हीं अद्वैती शैवांचीच ठेवली. इतर प्रांतांत वेगळा प्रकार दिसतो. आरंभीं तरी त्रैपुर-उपासनेचा प्रवेश काश्मिराहून अन्य प्रांतांत झाला होता असें वाटत नाहीं- निदान तसा पुरावा उपलब्ध असल्याचें माहीत नाहीं. काली, तारा, छिन्नमस्ता या देवतांची उपासना तेथें आरंभीं असावी. बौद्ध लोकांत या उपासना जुन्या काळीं होत्या आणि मिथिला, मगध, अंग, वंग इत्यादि देशांत बौद्ध धर्माचा प्रसार झाला होता; म्हणून बौद्धांकडून या उपासना वैदिकांनीं घेतल्या व आत्मसात् केल्या असें अनुमान केलें पाहिजे असें मी म्हणत नाहीं. माझा सांगण्याचा आशय एवढाच आहे कीं, त्रिपुरा ही त्या प्रांतांतील लोकांची मूळ उपास्य देवता नव्हती असें वाटतें. अद्वैत तत्त्वज्ञान हें फक्त त्रिपुरोपासनेंतच आहेसें दिसतें; कारण ही उपासना ज्ञानप्रधान आहे. पण हें शुष्क, नीरस, निर्गुण ज्ञान नव्हे; भक्तियुक्त ज्ञान आहे.[२७] असो. शक्तीच्या इतर स्वरूपांच्या उपासना भक्तिप्रधान आहेत. ज्ञान व भक्ति हीं परस्परविरोधी आहेत असें माझें म्हणणें आहे असा गैरसमज कोणी करून घेऊं नये. मानवस्वभावानुसार, साध्य एकच असतांहि साधनांची गौणता व प्रधानता पहावयाची असते एवढेंच माझें म्हणणें आहे. मानवस्वभावाचे दोन प्रकार आहेत. एक शिवतत्त्वप्रधान असतो. असा मनुष्य मुख्यतः बुद्धिवादी असतो. हा ज्ञानाला प्राधान्य देईल. पण त्याच्यांत श्रद्धा अथवा भक्ति नसते असें नव्हे. दुसरा शक्तितत्त्वप्रधान असतो. असा मनुष्य मुख्यतः भावनाशील असतो. हा श्रद्धा-भक्तीला प्राधान्य देईल. पण त्याच्यांत ज्ञान नसतें असें नव्हे. असो. याचा अधिक विचार सध्यां अप्रस्तुत आहे.

शंकराचार्यांच्या काळापर्यंतचा विचार येथवर झाला. त्यापुढच्या काळाबद्दलचा विचार थोडा वेगळ्या तऱ्हेनें केला पाहिजे. इ. स. च्या ९ व्या १० व्या शतकापासून हिंदुस्थानांत प्रान्तीयतेचा उगम होऊं लागला होता. मराठी व कानडी भाषा प्रौढ होऊं लागल्या होत्या. कारण इ. स. ११ व्या शतकापासून त्यांच्यांत ग्रंथरचना होऊं लागली. तामिळ भाषेंत यापूर्वीपासूनचें वाङ्मय होतेंच. इ. स. १० व्या शतकांत गुजराथेंत मूळराजाच्या कारकीर्दींत उत्तरेकडील ब्राह्मणांची आयात मोठ्या प्रमाणांत झाली व गुर्जर संस्कृतीचा प्रारंभ झाला. इ. स. ११ व्या शतकापासून मुसलमानांच्या स्वाऱ्या एकसारख्या होऊं लागल्या. त्यानंतर हिंदी भाषेची सुरवात झाली. पूर्वेकडे बंगाली भाषाहि प्रौढ होत होती. काश्मिरांत जुनी संस्कृति तद्देशीय भाषेंत येण्याच्या तयारींत होती. अशा

---

२७ अद्वैतांत भक्तीला वाव नाहीं म्हणणाऱ्यांनीं हीं वचनें पहावींत:- देहबुद्ध्या तु दासोऽहं जीवबुद्ध्यात्वदंशकः। आत्मबुद्ध्या त्वमेवाहं इति मे निश्चिता मतिः॥ असें भक्त आपल्या इष्ट उपास्याला सांगत आहे. तसेंच शंकराचार्य म्हणतातः-सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वम्। सामुद्रो हि तरंग क्वचन समुद्रो न तारंगः॥ आचार्य भक्त नसते तर त्यांच्याकडून स्तोत्रनिर्मिति झालीच नसती.

प्रकारें प्रान्तीय वाङ्मयाला हळूहळू सुरवात होत होती. म्हणून मी मानलेल्या तिसऱ्या काळांतला, ह्या संप्रदायाचा इतिहास लिहिणें झाल्यास, त्या त्या प्रान्तांत त्या त्या उपासनांचा प्रसार कसा कसा झाला तें प्रान्तवार लिहिणें सोईचें होईल असें मला वाटतें. तें सध्यां शक्य नाहीं.

मला वाटलें होतें त्यापेक्षां हा लेख पुष्कच लांबला आहे; तथापि तें अनिवार्य होतें. बऱ्याच गोष्टी मला सूत्ररूपानें सांगाव्या लागल्या आहेत. तरी पण ही संधि भारत-इतिहास-संशोधक-मंडळानें मला दिली याबद्दल मण्डळाच्या कार्यकर्त्यांचे अन्तःकरणपूर्वक आभार मानतों.

---

# ३ काण्व – साम्राज्य

( लेखकः— श्री. नारायण श्रीनिवास राजपुरोहित
इतिहास-संशोधक, धारवाड )

हा लेख इतिहास-संशोधनात्मक आहे. मौर्य साम्राज्य, शुंग-साम्राज्य व काण्व-साम्राज्य हीं तीनहि ख्रिस्ताच्या पूर्वकालीं होऊन गेलीं आहेत. हें इतिहासप्रसिद्धच आहे. मौर्य-साम्राज्य ( ख्रि. पू. ३२२-१८५ ), शुंग-साम्राज्य ( ख्रि. पू. १८५-७३ ) व काण्व-साम्राज्य ( ख्रि. पू. ७३-२८ ). हीं साम्राज्यें वायु, मत्स्य, विष्णु व भागवत ह्या चारहि पुराणांत कीर्तित झालीं आहेत. त्यापैकीं काण्व-साम्राज्याबद्दल उल्लेख करितांना श्री. व्ही. एस्. बखले, M. A, LL B. यांनीं जर्नल ऑफ दी रॉयल एशियाटिक सोसायटी बाँबे ब्रँचच्या मे १९२८ च्या ( Vol. VII ) नं. १ व २ पान ४६ वर काण्व ब्राह्मण राजांच्या संबंधीं हे राजे "काण्वायन" गोत्राचे ब्राह्मण होते असें सांगितलें आहे. परंतु ते तसे काण्वायन गोत्राचे ब्राह्मण नसून शुक्ल यजुर्वेदांतर्गत काण्व शाखीय ब्राह्मण होते हें सप्रमाण दाखविण्याचा ह्या लेखाचा उद्देश आहे.

प्रारंभीं हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं; ( १ ) कण्व, ( २ ) काण्व व ( ३ ) काण्वायन हीं तिन्हीं गोत्रें अगदीं भिन्न भिन्न आहेत. त्याला मुख्य आधार म्हणजे पुरुषोत्तम-विरचित "गोत्रप्रवर-निबन्ध-कदम्बम् ।" अथवा "गोत्रप्रवरमञ्जरी ।" हा प्राचीन ग्रंथ होय. हा ग्रंथ 'म्हैसूर ओरिएंटल् लायब्ररी' या संस्थेनें इ० स० १९०० मध्यें व लक्ष्मीव्यंकटेश मुद्रणालय कल्याण, मुंबई येथें इ० स० १९१७ मध्यें प्रसिद्ध केला आहे.

या गोत्रप्रवरमञ्जरी ग्रंथांतून तीनहि गोत्रांचें विवरण असें केलें आहेः—

(१) कण्व गोत्र—केवलांङ्गिरस गण।

(त्रिप्रवराः)

(१) अङ्गिरस (२) अजामीढ (३) काण्व (अथवा घौरकाण्व).

(२) काण्व गोत्र—वासिष्ठ गण।

(त्रिप्रवराः)

(१) वासिष्ठ (२) इंद्रप्रमद (३) आभरद्वसु.

(३) काण्वायन गोत्र—भारद्वाज गण।

(पञ्चप्रवराः)

(१) अङ्गिरस (२) बार्हस्पत्य (३) भारद्वाज (४) शैन्य (५) गार्ग्य.

१ गोत्र नव्हे शाखा—

काण्वसाम्राज्याचा मूळसंस्थापक **वसुदेव** नामक चक्रवर्ति होता. ह्याचा पुत्र **भूमित्र,** पौत्र **नारायण** व प्रपौत्र **सुशर्मा** होता. हें खालील प्रमाणें कोष्टक मांडल्यास वाचकांना जास्त स्पष्ट होईल.

| | | | |
|---|---|---|---|
| मूळ पुरुषः– | वसुदेव | कण्व | |
| पुत्रः– | भूमित्र | " | वसुदेवादयः |
| पौत्रः– | नारायण | " | काण्वायनाः द्विजाः। |
| प्रपौत्रः- | सुशर्मा | काण्व | (श्रीधरस्वामी) |

भागवत पुराण द्वादशस्कन्ध प्रथम अध्याय १८, १९, २० श्लोक असे आहेतः—

शुङ्गं हत्वा देवभूतिं कण्वोऽमात्यस्तु कामिनम्।
स्वयं करिष्यते राज्यं वसुदेवो महामतिः॥ १८॥

तस्य पुत्रस्तु भूमित्रस्तस्य नारायणः सुतः।
काण्वायना इमे भूमिं चत्वारिंशच्च पञ्च च॥ १९॥

शतानि त्रीणि भोक्ष्यन्ति वर्षाणां च कलौ युगे।
हत्वा काण्वं सुशर्माणं तद्भृत्यो वृषलो बली।
गां भोक्ष्यत्यन्ध्रजातीयः कंचित्कालमसत्तमः॥ २०॥

या तिन्ही श्लोकांवरील श्रीधरस्वामीकृत टीका अशी आहे:—

"तदमात्यो वसुदेव नामा कण्वो-राज्यं करिष्यति ॥ १८ ॥

काण्वानां चतुर्थः सुशर्मा इमे वसुदेवादयः काण्वायना वर्षाणां त्रीणि शतानि पञ्चचत्वारिंशद्वर्षाणि च भूमिं भोक्ष्यन्ति ॥ १९ ॥

काण्वानामन्तिमं सुशर्माणं हत्वा बली नामा तद्भृत्यो गां भोक्ष्यति ॥ २० ॥

मूळ पुरुषाचें गोत्र कण्व-गोत्र, त्याच्या प्रपौत्राचें गोत्र काण्व गोत्र व वसुदेवादि चौघांचेंहि मिळून काण्वायन गोत्र, असें होणें शक्य आहे काय? गोत्र म्हणजे वंश. अतएव सर्व वंशजांचें गोत्रनाम एकच असणें क्रमप्राप्त आहे, किंबहुना अनिवार्य आहे.

ह्या स्थळीं एकाच वंशाला कण्व, काण्व, काण्वायन असे तीन भिन्न भिन्न शब्द योजिल्यामुळें हे तिन्ही शब्द गोत्रवाचक नसून शाखावाचक आहेत हें सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट आहे.

"काण्वायन" हा शब्द "गोत्र" म्हणून सांगण्याचा पुराणकारांचा उद्देश असता तर (१) गोत्र, (२) सगोत्र, (३) गोत्रज, (४) गोत्रोत्पन्न, (५) गोत्रसंभव, (६) गोत्रपवित्र ह्या सहा पदांपैकीं कोणतेंहि एक पद गोत्रनामापुढें सांगणें क्रमप्राप्त होतें, किंबहुना अपरिहार्य होतें. कारण प्राचीन भारतीय वाङ्मयांत गोत्रनाम सांगण्याची हीच पद्धत स्पष्टपणें दृग्गोचर होते. परंतु पुराणांत "काण्वायन" शब्दापुढें "गोत्र" अथवा "सगोत्र" इत्यादि एकहि पद योजिलें नाहीं; त्यामुळें "कण्व," "काण्व," "काण्वायन" हीं तीनहि पदें ह्या संदर्भांत गोत्रवाचक नसून काण्वशाखेचेच तीन पर्याय शब्द आहेत.

त्या तीन शब्दांत "काण्व" हा शब्द शाखावाचक आहे हें प्रसिद्धच आहे. आतां "कण्व" व "काण्वायन" हे दोन्ही शब्द देखील शाखावाचकच कसें आहेत तें पहा:—

महामहोपाध्याय श्री नागेशभट्टविरचित "परमलघुमञ्जुषा" या ग्रंथांत (पृ. ७) पांच न्याय दाखविण्यांत आले आहेत,

(१) तात्स्थ्यात् ... ... ... ... ताच्छब्द्यम्

(२) ताद्धर्म्यात् ... ... ... ... ,, (सिंहोमाणवकः)

(३) तत्सामीप्यात् ... ... ... ,,

(४) तत्साहचर्यात् ... ... ... ,,

(५) तादर्थ्यात् ... ... ... ,,

या पांच न्यायांपैकीं 'ताद्धर्म्यात्— ताच्छब्द्यम्' या न्यायानें काण्वशाखेस "कण्वशाखा" असें म्हणण्याचा परिपाठ आहे. कारण कण्व ऋषींच्या वैयक्तिक

आचरणाप्रमाणेंच काण्वशाखेच्या ब्राह्मणांचें आचरण असल्यामुळें, या न्यायानें "काण्व शाखीय ब्राह्मणांना" "कण्व-शाखा" असें नाम प्राप्त झालें आहे. महाराष्ट्रांत हें नांवच प्रचारांत आहे.

आतां "काण्वायन" या शब्दाबद्दल विचार करूं. अयन म्हणजे मार्ग अथवा पद्धति. "काण्वायन म्हणजे काण्वशाखीय पद्धतीनें आचरण करणारे, अर्थात् काण्व-शाखीय गृह्यसूत्र व श्रौतसूत्र या दोन सूत्रांनीं दाखविलेल्या मार्गानें चालणारे म्हणजे आचरण करणारे ब्राह्मण; अतएव "**काण्वायन**" म्हणजे" काण्वशाखीय ब्राह्मण."

वेदाला एक वृक्ष समजून त्या वेदांच्या उपभेदांना शाखा म्हणण्याचा परिपाठ सुप्रसिद्धच आहे. तसेंच "अयन" (म्हणजे मार्ग) हा शब्दप्रयोग उपयोजिला गेल्याचेंहि वर दाखविलें आहे. त्याप्रमाणेंच "शाखेला" "वंश" असें म्हणण्याचीहि प्रथा आहे. त्याला उदाहरण पुढीलप्रमाणें—एपिग्राफिआ कर्णाटिका व्हाल्युम ५, पार्ट १, हासन जिल्ह्यांतील शिलालेख, हासन तालुक्यांतील शिलालेख नंबर ६६ (इ. स. ११७० चा शिलालेख) त्यांतील उल्लेख पुढीलप्रमाणें आहे:—

("काण्ववंशोद्भवनुम् काश्यप गोत्र पवित्रनुम् श्रीमान् महाप्रधानम् लकुमय्यम् (लक्ष्मणय्यम्)"

हा लक्ष्मणय्य होयसल यादव घराण्यांतील १ ल्या नरसिंह राजाचा महाप्रधान होता. वरील शिलालेखांत प्रधान लक्ष्मणय्याचें गोत्र काश्यप म्हणून सांगितलें असून, त्याच्या शाखेचा उल्लेख काण्व-वंश म्हणून निःसंदिग्धपणें स्पष्ट केला आहे. म्हणजे काण्व-वंश म्हणजेच काण्व-शाखा ह्यांत संदेह नाहीं. वरील विवेचनावरून असें निष्पन्न होतें कीं, "काण्वायन" "काण्ववंश" वगैरे शब्द काण्वशाखेबद्दलच आहेत.

श्रीधरपंडितांनीं "**काण्वानां चतुर्थः सुशर्मा**" व "**काण्वानाम् अन्तिमं सुशर्माणम्**' असें "**काण्वानाम्**" हें पद दोनदां स्पष्टपणें सांगितल्यामुळें "काण्व-सम्राट्" काण्वशाखेचेच ब्राह्मण होते असें आपलें मत त्यांनीं स्पष्टपणें व्यक्त केलें आहे.

मत्स्यपुराणांत अध्याय २७२ मध्यें ३४ व्या श्लोकांत "**काण्वायनाः नृपाः**" असा उल्लेख आलेला आहे. त्याच अध्यायांत ३५ व्या श्लोकांत "काण्वाः भोक्ष्यन्ति वै महीम्" असा उल्लेख आलेला आहे. तसेंच विष्णुपुराणांत ४ थ्या अंशांत २४ व्या अध्यायांतील ३९ व्या श्लोकांत 'कण्व वसुदेव नामा' असा उल्लेख आहे; व ४२ व्या श्लोकांत "काण्वायना" असा उल्लेख आलेला आहे. ४३ व्या श्लोकांत 'सुशर्माणं तु काण्वम्' असा आहे. ह्यावरून असें दिसून येईल कीं; मत्स्यपुराणांत काण्वराजांना '**काण्वायन**,' 'काण्व' असें संबोधिलें असून विष्णुपुराणांत '**कण्व**,' '**काण्व**'

'**काण्वायन**' या तीनहि नामांनीं संबोधिलें आहे. म्हणून **काण्वायन** हें गोत्राचें नांव नसून शाखेचें नांव आहे. हीं तिन्हीं गोत्रें भिन्न-भिन्न असल्याचें वर सांगितलेंच आहे.

सारांश वायु, मत्स्य, विष्णु, भागवत या चारहि पुराणांचा समन्वय केला असतां असें निष्पन्न होतें कीं; "**काण्वायन,**" "**काण्व,**" "**कण्व**" हें तीनहि शब्द काण्वशाखावाचकच आहेत; गोत्रवाचक नव्हेत.

वर सुरवातीस सांगितल्याप्रमाणें श्रीमान् **व्ही. एस्. बखले** यांनीं Satavahanas and the contemporary Kshatrapas असा लेख लिहिला आहे. त्यांतील उतारा पुढें दिला आहेः—

"In 80 B. C. Devabhuti the last king of the Sunga dynasty was put to death by his own minister of the Kanvayana gotra[10]; and for about forty years thereafter this new dynasty ruled over the provinces or some of the provinces held by the Sungas.

We have no more information of the kings of the Kanva dynasty than that supplied by the Puranas and even this conflicts with the epigraphic evidence available."

श्री. **बखले** यांनीं पादटीपेंतील आधारभूत दिलेल्या 'हर्षचरित' (निर्णयसागर प्रत पृ. १९९) ह्या ग्रंथांत फक्त अशी वाक्यें आहेतः–

"अति स्त्रीसङ्गरतमनङ्गपरवशं शुङ्गममात्यो वसुदेवो देवभूतिं दासीदुहित्रा देवीव्यञ्जनया वीतजीवितमकारयत् ।" ह्यांत काण्वायन गोत्र हा शब्द मुळींच नाहीं. वर सांगितल्याप्रमाणें मंत्री वसुदेवानें दासीपुत्रीकडून देवभूति राजाचा वध करविला हें बरोबर आहे. पण वसुदेव मंत्री घराणें काण्वायन गोत्राचें होतें त्याबद्दल बखले ह्यांनीं आपल्या लेखांत कोठेंहि आधार दिला नाहीं. तसेंच ह्या राजांना काण्वायन गोत्राचे संबोधून लगेच दुसऱ्या परिच्छेदांत त्यांना Kanva dynasty म्हणून संबोधितात. कारण 'कण्व,' 'काण्वायन,' 'काण्व' अशी तीन निरनिराळीं गोत्रें असल्याची श्री. बखले यांना जाणीव नाहीं.

## २ अशुद्ध शब्ददोष—

सुप्रसिद्ध प्रौढ इतिहाससंशोधक कै. डॉक्टर सर आर. जी. भांडारकर ह्यांनीं इ. स. १८८४त प्रसिद्ध केलेल्या आपल्या "Early History of the Dekkan" (Written for the Bombay Gazetteer) ह्या पुस्तकांत पृ. २४ वरील

10 Harshacharita (Nirnayasagar Ed. P. 199)

पादटीपेंत 'काण्वायनाः द्विजाः' असें वायुपुराणांतील वाक्य उद्धृत केलें आहे. पुढें इ० स० १८८८ सालीं The Asiatic Society of Bengal या संस्थेनें श्री. राजेंद्रलाल मित्र LL. D., C. I. E. ह्यांनीं संपादिलेला वायुपुराणाचा द्वितीय खंड प्रसिद्ध केला. बंगालमधील वायुपुराणाच्या नक्कलकारांनीं संस्कृतांतील अनभिज्ञतेमुळें हस्तलिखित प्रतींत फारच अशुद्ध रूपें घातलीं आहेत. संपादकांनींहि शुद्ध पाठ, अशुद्ध पाठ हे चिकित्सादृष्टीनें न पाहतां तसेंच प्रसिद्ध केलेले असल्यामुळें द्वितीय खंडांतील ३७ व्या अध्यायांतील ३३८, ३४०, ३४२ ह्या श्लोकांत "काण्वायन" या शब्दा- ऐवजीं 'कण्ठायन' असें अशुद्ध रूप पडलें आहे. नंतर १८९५ सालीं बंगाल प्रतीची हुबेहूब नक्कल करून, खेमराज श्रीकृष्णदास यांनीं मुंबईस आपल्या श्रीव्यंकटेश्वर मुद्रणालयांत प्रसिद्ध केलेल्या वायुपुराणांत "काण्वायना" असें सांगण्याच्या स्थळीं "कण्ठायना" असाच अशुद्ध शब्दप्रयोग छापला गेला आहे. त्यानंतर १० वर्षांनीं पुणें येथें १९०५ मध्यें श्रीव्यंकटेश्वर मुद्रणालयानेंच छापलेल्या वायुपुराणाचें अंधानुकरण करून, आनंदाश्रम संस्थेनें प्रसिद्ध केलेल्या वायुपुराणांतहि 'कण्ठायना द्विजाः' (अ. ९९ श्लो. ३४६) असेंच छापलें आहे. कै. डॉ. भांडारकरांनीं स्वीकारलेल्या वायुपुराणांत आणि मत्स्य, विष्णु, भागवत पुराणांत "**काण्वायन**" शब्द आहे; 'कण्ठायन' शब्द **मुळींच** नाहीं.

ज्याअर्थीं श्री. वखले काण्व राजे हे काण्वायन गोत्राचे आहेत असें म्हणतात, त्याअर्थीं या राजवंशाला काण्वायन dynasty म्हणावयास पाहिजे होतें. त्या राजवंशास काण्व dynasty म्हणणें यथार्थ नाहीं हें त्याचें ध्यानांत आलें नाहीं.

---

## ४ शकनृपति श्रीधरवर्म्याचा एरण येथील स्तंभलेख

( लेखकः— प्रा. वा. वि. मिराशी, एम्. ए., नागपूर )

*मध्यप्रदेशाच्या सागर जिल्ह्यांतील खुरई तहशिलींत एरण नांवाचें अत्यंत प्राचीन नगर आहे. त्या ठिकाणीं खिस्तपूर्व तीनचार शतकांइतकीं प्राचीन नाणीं सांपडतात. तेथें अनेक प्राचीन देवालयांचे अवशेष, विष्णु, वराह, नरसिंह इत्यादिकांच्या विशाल मूर्ति, उत्तुंग स्तंभ व कित्येक प्राचीन शिलालेख आणि स्तंभलेख अद्यापि विद्यमान आहेत. तेथें सांपडलेल्या कांहीं नाण्यांवर त्या नगराचें प्राचीन नांव 'एरिकिण' हें प्राकृत भाषेंत लिहिलेलें आढळतें. सुमारें पाऊणशें वर्षांपूर्वीं जनरल कनिंग्हामनें या ठिकाणाची पाहणी करून तेथील अवशेषांचें विस्तृत वर्णन आपल्या रिपोर्टाच्या दहाव्या भागांत प्रसिद्ध केलें.

* मंडळ संमेलन ३९ वें (श. १८७४– सन १९५२)

एरणजवळ बीना नदीच्या कांठीं कनिंग्हामला एका शिवलिंगावर कोरलेला लेख आढळला. तो पुढें डॉ. फ्लीटनें आपल्या 'उत्कीर्ण गुप्त लेख' या पुस्तकांत प्रसिद्ध केला. त्यामध्यें 'गुप्तनृपति भानुगुप्त याचा मित्र गोपराज हा येथें युद्धांत शौर्यानें लढत असतां मृत्यु पावला व त्याची पत्नी सती गेली' असा उल्लेख आला आहे. हा लेख गुप्त-संवताच्या १९१ या वर्षाचा म्हणजे ख्रिस्तोत्तर ५१० चा आहे. या लेखावरून एका स्तंभाच्या अवशिष्ट भागाला पुढें शाळुंका जोडून त्याचें शिवलिंग बनविण्यांत आलें असें दिसतें. याच शिवलिंगावरील दुसरा एक कोरीव लेख गतवर्षीं दृष्टीस पडला. तो येथें दिला आहे.

हा लेख कसा माहीत झाला याची हकीकतहि मनोरंजक आहे. १९५१ च्या जानेवारी महिन्यांत पाटणा येथील पुराणवस्तुसंशोधन खात्याचे सुपरिंटेंडंट श्री. कृष्ण-देव हे मध्यप्रदेशांतील प्राचीन स्थळांची पाहणी करण्याकरितां आले होते. त्यांना एरण येथील वर उल्लेखिलेल्या शिवलिंगाच्या शाळुंकेवर दगडमातीचा थर जमून त्यायोगें गोपराजाच्या लेखाची एक ओळ लुप्त झाली आहे असें दिसलें. तेव्हां त्यांनीं तो थर काढून टाकण्याचा आदेश दिला. तसें करीत असतां सबंध शाळुंकाच निखळली व तिच्या खालीं त्याच शिवलिंगरूपी स्तंभावर असलेला दुसरा लेख दृष्टीस पडला. नागपूर वस्तुसंग्रहालयाचे असिस्टंट क्यूरेटर श्री. रोडे हे त्यानंतर एरण येथें गेले होते. त्यांनीं त्या लेखाचे फोटोग्राफ घेतले त्यावरून मला या लेखाची माहिती प्रथम झाली. नंतर माझ्या विनंतीवरून भारतसरकारचे लेखशास्त्रज्ञ डॉ. छाबरा यांनीं एरण येथें जाऊन त्या लेखाचे उत्कृष्ट छापे घेतले व ते मला पाठविले. त्यावरून मीं या लेखाचें प्रथम वाचन केलें. लेख त्रुटित व खराब स्थितींत असल्यामुळें कांहीं अक्षरांचें वाचन संदिग्ध होतें. म्हणून एरण येथें जाऊन लेख समक्ष पाहिला. मूळ लेख व त्याचे छाप यांवरून केलेलें वाचन खालीं दिलें आहे.

हा लेख ज्यावर कोरला आहे तो स्तंभ तीन ठिकाणीं अष्टकोणी व त्यावरच्या तीन भागांत षोडशकोणी असून शेवटीं वाटोळा केला आहे. अष्टकोणी भागांवर तीन लेख आहेत. अगदीं खालच्या भागावर प्रस्तुत लेख, मध्यभागावर गोपराजाचा लेख व वरच्या भागावर दुसरा एक गुप्तकालीन सध्यां अस्पष्ट झालेला लेख, असे ते तीन लेख आहेत.

प्रस्तुत लेखाचा उजव्या बाजूचा एकतृतीयांश भाग पूर्णपणें नष्ट झाला आहे. राहि-लेल्या भागांतील अक्षरेंहि अनेक ठिकाणीं अतिशय खराब किंवा पूर्णपणें नष्ट झालीं आहेत. त्यामुळें हा लेख वाचणें अत्यंत कष्टाचें काम झालें आहे. तथापि चिकाटीनें प्रयत्न केल्यावर या लेखाचा अवशिष्ट राहिलेला बहुतेक भाग वाचतां येतो.

अक्षरवटिका— या लेखाची लिपी मध्यभारतांतल्या लेखांच्या सारखी दक्षिणी वळणाची आहे. सांचीजवळ कानाखेडा येथें श्रीधरवर्म्याचा लेख सांपडला आहे त्याची

लिपीहि याच वळणाची आहे. तिसऱ्या ओळींत २७ ही संख्या शब्दांनीं तसेंच २० व ७ दर्शविणाऱ्या संख्याचिन्हांनींहि दाखविली आहे. संख्या दर्शविण्याची ही पद्धति प्राचीन होय.

भाषा– या लेखाची भाषा संस्कृत असून आरंभींचा भाग गद्यांत आहे व शेवटीं स्रग्धरा वृत्तांत एक श्लोक घातला आहे. हाच प्रकार कानाखेडा लेखांतहि दिसतो. भाषा बहुतेक शुद्ध आहे, पण कांहीं ठिकाणीं प्राकृत भाषेचे अवशेष दिसतात. उदाहरणार्थ, 'महाक्षत्रपस' हें षष्ठ्यंत रूप महाक्षत्रपस्य–बद्दल व 'सप्तविंशतिमे' हा 'सप्तविंशतितमे' बद्दल योजलेला शब्द पहा.

हा लेख, शकनंदाचा पुत्र 'राजा' व 'महाक्षत्रप' या पदव्या धारण करणाऱ्या शकवंशी श्रीधरवर्म्याच्या कारकीर्दीच्या सत्ताविसाव्या वर्षी कोरला होता. याच राजाच्या कानाखेडा येथील लेखांत त्याला 'महादंडनायक' म्हटलें आहे. तो लेख त्याच्या कारकीर्दीच्या तेराव्या वर्षी कोरला होता. त्या लेखांत महिना, पक्ष व तिथि यांचा निर्देश आहे. तसा निर्देश प्रस्तुत लेखांतहि असावा पण तो आतां नष्ट झाला आहे. या लेखांत कानाखेडा लेखांतल्याप्रमाणें श्रीधरवर्म्याचें वर्णन 'धर्मविजयी' असें केलें आहे. कौटिलीय अर्थशास्त्रांत विजेत्या राजांचे धर्मविजयी, असुरविजयी व लोभविजयी असे तीन प्रकार वर्णिले आहेत. जो राजा शत्रूच्या शरणागतीनें संतुष्ट होतो, त्याचें राज्य व द्रव्य हरण करूं इच्छित नाहीं, तसेंच त्यास ठार मारून त्याच्या भार्यादिकांचें अपहरण करीत नाहीं तो धर्मविजयी. शक नृपति श्रीधरवर्म्यानें धर्मविजयी राजाप्रमाणें वर्तन केलें हें विशेष होय. कानाखेडा लेखांत त्याला महासेन किंवा कार्तिकेय याचा उपासक म्हटलें आहे. प्रस्तुत लेखांतहि तसा निर्देश पहिल्या ओळीच्या शेवटीं आला असावा, पण तो आतां अस्पष्ट झाला आहे.

प्रस्तुत लेखाचा एकतृतीयांश भाग नष्ट झाल्यानें त्याचा सर्व अर्थ लावणें किंवा त्यांतील मजकूर पूर्णपणें देणें शक्य नाहीं. अवशिष्ट भागावरून कांहीं अनुमानें करतां येतात. या लेखाचे दोन उद्देश दिसतात— (१) पहिला उद्देश नगेन्द्राहारांतील थाटि-रिका नामक पथकांत एरिकिण अधिष्ठानांत नारायणस्वामी नामक गृहस्थानें गोब्राह्मण-प्रमुख अशा अधिष्ठानाच्या उपयोगाकरितां तसेंच स्वतःच्या मातापित्यांच्या पुण्यवृद्धी-करितां नदीवर तीर्थ किंवा घाट बांधला हें नमूद करण्याचा असावा. प्रस्तुत स्तंभ किंवा शिवलिंग एरण गांवाजवळ वाहणाऱ्या बीना (प्राचीन वेण्वा) नदीच्या कांठाजवळच अद्यापि आहे. या नदीलाच हा घाट बांधला असावा. (२) दुसरा उद्देश शकवंशी महाक्षत्रप व राजा श्रीधरवर्मा याचा आरक्षिक (पोलिसदलाचा प्रमुख) व सेनापति महाराष्ट्रीय सत्यनाग यानें अरिष्टशान्ति, समृद्धि व सर्व प्राण्यांचें सुख व हित, पारलौकि-की यष्टि किंवा स्तंभ उभारला हें जाहीर करण्याचा असावा. शेवटच्या तीन

ओळींत स्रग्धरा वृत्तांतील श्लोक घातला आहे त्याचा बराचसा भाग खंडित किंवा अस्पष्ट झाला आहे. तथापि अवशिष्ट भागावरून-' नागांनींच येथें उभारलेली यष्टि अखंड राहून लोकांना क्षत्रराष्ट्राच्या धर्माचें किंवा कर्तव्याचें शिक्षण देवो; कारण हें स्थान शत्रु व मित्र यांना सारखेंच आदरणीय असें आहे' असा आशय त्या श्लोकामध्यें व्यक्त केलेला दिसतो.

मागें सांगितल्याप्रमाणें शकनन्दाचा पुत्र महादण्डनायक शक श्रीधरवर्मन् याचा लेख सांची जवळ कानाखेडा-येथें कांहीं वर्षांपूर्वीं सांपडला होता. त्यांत त्याच्या कारकीर्दीचें तेरावें वर्षहि उल्लेखिलें होतें. तथापि त्याच्या 'महादंडनायक' या पदवीवरून तो स्वतंत्र नसून दुसऱ्या कोणा राजाचा अंकित असावा असें मानलें जात असे. प्रस्तुत लेखांत त्याच्या 'राजन्' व 'महाक्षत्रप' या पदव्या दिल्या आहेत. माळवा व काठेवाड येथील क्षत्रपांच्या लेखांतहि याच पदव्या येतात. त्या पूर्ण स्वातंत्र्याच्या द्योतक असल्यामुळें श्रीधरवर्मा स्वतंत्र होता याविषयीं आतां संशय राहत नाहीं.

कानाखेडा लेखाच्या शेवटीं आणखी एक कालनिर्देश आला आहे, पण त्याचें वाचन व अर्थ या बाबतींत संशोधकांत एकवाक्यता नाहीं. कै. राखालदास बॅनर्जी यांच्या मतें त्या लेखाच्या शेवटीं २०१ ही संख्या कालनिदर्शक म्हणून कोरली आहे. हें वर्ष शकसंवताचें मानून ते कानाखेडा लेखाचा काळ ख्रिस्तोत्तर २७९ हा देतात. कै. एन्. जी. मुजुमदार यांच्या मतें हें वाचन चूक असून त्या लेखाची मिती २४१ आहे. हें वर्ष शकसंवताचें असावें. अर्थात् त्याच्या मतें त्या लेखाचा काळ ख्रिस्तोत्तर ३१९ हा येतो. मी स्वतः त्या लेखाचा अभ्यास केला त्यावरून माझें असें मत झालें आहे कीं, त्या लेखांत १०२ हें वर्ष दिलें आहे. हें वर्ष आभीर किंवा तथाकथित कलचुरि शकाचें असावें. तसें तें मानल्यास त्या लेखाचा काळ ख्रिस्तोत्तर ३५१ हा येतो. हें वर्ष श्रीधरवर्म्याच्या कारकीर्दींतील तेरावें होतें. तेव्हां तो इ. सन ३३९ मध्यें गादीवर आला असावा. प्रस्तुत एरण लेख त्याच्या कारकीर्दीच्या सत्ताविसाव्या वर्षी म्हणजे इ. स. ३६५ मध्यें कोरला असावा.

कानाखेडा लेखांत उल्लेखिलेल्या 'महादण्डनायक' या पदवीवरून श्रीधरवर्मा हा आरंभीं एखाद्या राजाचा मुख्य सेनापति असावा असें दिसतें. त्याच्या लेखांतील आभीर शकाच्या उपयोगावरून त्याचा स्वामी आभीरनृपति असावा असें अनुमान करतां येतें. आभीरांची सत्ता निर्बल झाल्यावर त्यानें आपलें स्वातंत्र्य पुकारून स्वतःच्या कारकीर्दीचीं वर्षें आपल्या कोरीव लेखांत नमूद करण्यास आरंभ केला; तथापि त्यानें आपली पूर्वीची 'महादंडनायक' पदवी किंवा आपल्या राज्यांत चालू असलेला 'आभीर' शक यांचा एकदम त्याग केला नाहीं. या तऱ्हेचीं उदाहरणें भारतीय इतिहासांत अनेक आहेत. पुढें त्यानें आपली पूर्वीची पदवी टाकून माळव्याच्या क्षत्रपांप्रमाणें 'राजन्' व

‘ महाक्षत्रप ’ या पदव्या धारण केल्या व आपल्या पूर्वीच्या पारतंत्र्याचा निदर्शक जो आभीर शक त्याचाही आपल्या लेखांत निर्देश करणें सोडून दिलें असें दोन लेखांवरून स्पष्ट दिसतें.

प्रस्तुत लेख ज्यावर कोरला आहे त्याला ‘यष्टि’ असें म्हटलें आहे. यष्टि या संस्कृत शब्दाचें प्राकृतांत लट्ठि ( मराठी लाठ किंवा लाठी ) असें रूप होतें. कच्छ व काठेवाड या भागांत क्षत्रपांच्या काळचे कांहीं लेख सांपडले आहेत, त्यांत लोकांनीं आपल्या नातेवाईकांच्या किंवा मित्रांच्या स्मरणार्थ ‘लट्ठि’ उभारल्याचा उल्लेख आहे. हे लेख ज्यांवर कोरले आहेत त्या शिला लांबट आकाराच्या व अग्रभागीं गोल असलेल्या अशा आहेत. त्या सामान्य लोकांनीं उभारल्या होत्या. त्यावरून यष्टीच्या आकाराची कल्पना करणें बरोबर होणार नाहीं. प्रस्तुत लेखांत निर्देशिलेली यष्टि एका प्रचंड राज्याच्या सेनापतीनें उभी केली होती. अर्थात् ती योग्य आकाराची व पद्धतीची असली पाहिजे. त्या यष्टीचा सध्यां अवशिष्ट असलेला भाग साडे नऊ फूट उंचीचा आहे. हा फक्त वरचा भाग. त्याखालीं निदान तितकाच भाग असणें असंभवनीय नाहीं. त्यापैकीं कांहीं भाग जमिनींत गाडला गेल्यावर जोत्यावरचा यष्टीचा भाग सुमारें साडे नऊ ते दहा फूट उंचीचा असावा. अशा यष्टि किंवा स्मारक स्तंभ मृतव्यक्तींच्या स्मरणार्थ उभारीत असत. मनुस्मृतींत ( अध्याय ९, श्लो. २८५ ) त्यांचा उल्लेख आहे व या यष्टीचा जो नाश करील त्याला राजानें ५०० पण दंड करावा व नवी यष्टि पूर्ववत् स्थापन करावी असा आदेश दिला आहे. अशा मृत सैनिकांच्या स्मारकस्तंभांना गुजरात–काठेवाडांत ‘पाळिया’ व कर्नाटकांत ‘वीरकल्लु’ ( मराठी वीरगळ ) म्हणतात. त्यांवर बहुधा घोडेस्वाराचें चित्र असतें. प्रस्तुत शिलास्तंभावरहि [illegible] एक घोडेस्वार कोरला आहे. घोडेस्वारानें आपल्या डाव्या हातांत घोड्याचा लगाम व उजव्या हातांत तलवार घेतली आहे. त्यावरूनहि हा शिलास्तंभ [illegible] स्मारकस्तंभ म्हणून उभारला होता असें दिसतें.

आपलें कर्तव्य करण्याची स्फूर्ति अनेक शतकें देत होता यांत संशय नाहीं. कारण श्रीधरवर्म्यांच्या कालानंतर सुमारें दीडशें वर्षांनीं रानटी हूण लोकांच्या भारतावर स्वाऱ्या झाल्या व त्यायोगें सुसमृद्ध व बलाढ्य असें गुप्त साम्राज्यहि खिळखिळें झालें. खिस्तोत्तर पांचव्या शतकाच्या अखेरीस तोरमाण नामक हूण राजानें मध्य भारतापर्यंत आक्रमण केलें होतें. त्याच्या काळचा एक लेख एरण येथेंच तेथील प्रचंड वराहमूर्तीवर कोरलेला अद्यापि विद्यमान आहे. त्यानंतर थोड्याच वर्षांनीं एरण येथें एक भयंकर युद्ध झालें. त्यांत भानुगुप्त नामक गुप्तराजाचा मित्र गोपराज हा निधन पावला. तेव्हां त्याची साध्वी स्त्री सती गेली. या घटनेचा निर्देश याच स्तंभावर दुसऱ्या बाजूस कोरलेल्या लेखांत आला आहे. भानुगुप्ताचें कोणाशीं युद्ध झालें याचा निर्देश त्या लेखांत नाहीं. तथापि वरील माहितीवरून त्याचा शत्रु तोरमाण नामक हूण राजाच होता यांत संशय नाहीं. भारतभूमीला परकीयांच्या दास्यांतून सोडविण्याकरितां धारातीर्थीं शयन करणाऱ्या गोपराजाचें, स्मारक अशा पवित्रकर्तव्याचें शूर पुरुषांस सदैव स्मरण करून देण्याकरितां उभारलेल्या 'यष्टी'वर लेख कोरून व्हावें-यांत मोठेंच औचित्य आहे.

ही यष्टि आरंभीं तेरा फूट उंच होती असें दिसतें. कालांतरानें ती जमिनीवर पडून तिचे तुकडे झाले. तेव्हां तिचा वरचा भाग शिवलिंगाप्रमाणें गोल असल्यानें कोणी शिवभक्तानें त्याला शाळुंका लावून शिवलिंग बनविलें. त्यावर तीन लेख होते. त्यांपैकीं एक जमिनींत व दुसरा शाळुंकेंत दबला गेला होता. तिसरा मुद्दाम अस्पष्ट केला असावा. म्हणून हें शिवलिंग पूर्वीची यष्टि असावी असा संशय कोणासही आला नसावा. यष्टीवर गोपराज व त्याची पत्नी यांचें शिल्प व सैनिकांच्या आकृति कोरल्या होत्या; पण भारतीयांच्या नैसर्गिक अचिकित्सकतेमुळें त्यांचा कोणीही विचार केला नसावा.

या लेखांत सत्यनाग आपणांस 'माहाराष्ट्र' म्हणजे महाराष्ट्रीय म्हणवितो. महाराष्ट्र हें देशवाचक नांव पुराणादि प्राचीन ग्रंथांत येतें. पण या ग्रंथांचे काळ अनिश्चित आहेत. सिंहलद्वीपाच्या 'दीपवंश' व 'महावंश' ग्रंथांतहि अशोकानें महाराष्ट्रांत बौद्धधर्माचा प्रसार करण्याकरितां भिक्षु पाठविले होते असा निर्देश आहे. पण हे ग्रंथ पांचव्या सहाव्या शतकांतील आहेत. संस्कृत वाङ्मयांतील बृहत्संहिता, काव्यादर्शादि ग्रंथांत महाराष्ट्राचा निर्देश आहे; पण हे ग्रंथ इ. स. च्या सहाव्या शतकांतील किंवा नंतरचे आहेत. तेव्हां श्रीधरवर्म्यांच्या काळच्या म्हणजे इ. स. चौथ्या शतकांतील या लेखांत महाराष्ट्राचा निर्देश आहे तो कालक्रमानें पहिला ठरतो. त्यानंतर सुमारें तीनशें वर्षांनीं ऐहोळे लेखांत व युआन च्वांगच्या प्रवासवर्णनांत महाराष्ट्राचा उल्लेख येतो, तो कालक्रमानें पहिला निश्चित उल्लेख मानण्यांत येत असे. त्यापेक्षां प्रस्तुत लेखांतील उल्लेख पुष्कळच अगोदरचा आहे. याशिवाय या लेखांत एरणचें प्राचीन नांव 'एरिकिण' हें येतें. हें नांव 'एरिकित्र' या रूपांत एरणच्या प्राचीन नाण्यांवर येतें. समुद्रगुप्ताच्या

व हूण नृपति तोरमाणाच्याहि एरण येथील लेखांत तें 'ऐरिकिण' या रूपानें आढळतें. एरिकिण हें, अधिष्ठान किंवा नगर नगेन्द्र नामक आहारांतील किंवा जिल्ह्यांतील बाहिरिका नामक पथकांत किंवा तालुक्यांत अन्तर्भूत होतें. पण हीं प्रदेशनामें अद्यापि इतरत्र आढळलीं नाहींत.

## वाचन [1]

१ सिद्धम् [।*] राज्ञा(ज्ञो) महाक्षत्रपस(स्य) स्ववीर्य्या[र्ज्जि][त*]विजयविपुलकीर्तेर-[2]
. . . . . . . . . . . . . . . . . स्य

२ शकनन्दपुत्रस्य ध[र्म्म]विजयिनः [श्री]धरवर्म्म[णः] . . . . . . . . . . . .[3]
[स्वराज्या*]-

३ भिवृद्धिकरे वैजायिके सं[व]त्सरे सप्तविंशतिमे[4] २० ७ . . . . . . . . .[5]

४ एतद्दिवस[6]मेरिकिणाधिष्ठाणे(ने)स्य नगे[न्द्रा]हारबा[हि]रकायां[7] . . . . .
. . . . . . [नारा*]-

५ चणस्वामिना भक्तिपू[र्व्वं] तीर्थे गोब्राह्मणपुरोगस्य चाधि . . . . . . .[8]
मा . . . . . . .[9]

६ भिवृध्या(द्ध्य)र्थम् [।*] राज्ञः आराक्षिकेने(ण)[10] [से]ना[प]तिसत्यनागेन म-
[हाराष्ट्र*][11] . . . . . . . [प्र*]मु-

७ खेन माहाराष्ट्रेन(ण) शान्तिकर्द्धिसर्व्वसत्व(त्व)[सु]खहिताय स्व . . . . . . .[12]

---

१ मूळ स्तंभ व छाप यांवरून. यांतील कांहीं शब्दांच्या वाचनांत डॉ. छाबरा, श्री. लक्ष्मीनारायण राव व श्री. य. रा. गुप्ते यांचें साहाय्य झालें आहे. २ यापुढचीं अक्षरें-जितसेन महाकुमारपादानुध्यात-अशीं असावीं. ३ येथें नष्ट झालेल्या अक्षरांपैकीं शेवटचीं नऊ अक्षरें कानाखेडा लेखांतल्या प्रमाणें 'वर्षसहस्राय स्वराज्या-' अशीं असावीं. शेवटचीं तीन अक्षरें तर जवळजवळ निश्चित आहेत. ४ 'सप्तविंशतितमे' वाचावें. ५ येथें नष्ट झालेल्या भागांत कानाखेडा लेखांतल्याप्रमाणें महिना, पक्ष व तिथि यांचा निर्देश असून शेवटीं -पूर्वकम् असा शब्द असावा. ६ 'एतस्मिन्दिवसे-' वाचावें. ७ 'नगेन्द्राहारस्य बाहिरिकायां' वाचावें. हें सापेक्षसमासाचें उदाहरण आहे. याच्यापुढें 'पथके वेण्वानद्यां कारितं नारा-' असे शब्द असावे. ८ येथें नष्ट झालेले शब्द '-स्थानस्य स्वस्त्यर्थं' असे असावे. ९ येथील शब्द '-तापित्रोः पुण्या-' असे असावे. १० 'राज्ञ आरक्षिकेण' वाचावें. ११ येथील सामासिक शब्द 'महाराष्ट्राभिजन-नागप्रमुखेन' असा असावा. १२ येथें नष्ट झालेले शब्द 'स्वभोगाधिष्ठानेरिकिणे चशिरुच्छिता' असें असावे.

८ अपि च[।*] सिध्य[न्ते] प्रेरितान्तात्पृथुपृ[थिवीमी]शमान(ने)[१३] नरेन्द्रे ना[गै]रे — ᴗ — — ᴗ ᴗ ᴗ ᴗ

९ वपुषा क्षत्त्रराष्ट्र[स्य] धर्म्मा[नु।*] यष्टिशिपष्टा[१४] मखण्डस्थिति त ᴗ ᴗ ᴗ — — ᴗ — — ᴗ — —, — — — —

१० ᴗ सेवादरारिपु[सु][हृदां*] स्थानमेतत्प्रजानाम्[१५] [।।*]

---

## ५ ज्ञानदेवीची एक प्रत

(म. म. प्रा. **दत्तो वामन पोतदार**)

(१) *पुणें शहरांत शनवारपेठेंत राहणाऱ्या माझ्या एका स्नेह्यानें 'ज्ञानदेवी'ची एक जुनी हस्तलिखित प्रत मला दिली. ती मी आज आपणांसमोर ठेवीत आहें.

(२) पोथी एकटाकी सुवाच्य, मराठी भाग काळ्या भोर शाईनें, संस्कृत-गीतादि विभाग तांबड्या शाईनें अशी व्यवस्थित लिहिलेली व संपूर्ण आहे. कागद देशी जुनरी किंवा दौलताबादी आहे.

(३) हिच्यावर सर्वत्र '**ज्ञानदेवी**' असेंच नांव आहे.

(४) या प्रतींत जुनीं रूपें पुष्कळ आलीं आहेत–साधिजैल–म्हणौनि–इत्यादि रूपें आढळतात.

(५) पहिल्या अध्यायाच्या शेवटीं पुढील ओंव्या लिहिलेल्या आहेतः–

॥ "श्लोक ॥ ४७ ॥ वोवी ॥ २७५ ॥ येवं संख्या ॥ ३१२ ॥ ॥ येकनाथस्वामी ॥ ॥ हे ज्ञानदेवी शुद्ध टिका ॥ परि पाठांतरें शुद्धाबद्ध जाली होती देखा ॥ ते शोधुनि अर्थावबोध नेटका ॥ जनार्दनें येका प्रती शुद्ध करी ॥ १ ॥ नाना देशभाषा बोल निश्चीत ॥ परि अर्थगर्भें असती समर्थ ॥ खोडीमाडि कारितां विपरितार्थ ॥ अर्थ इदंमूल समजेना ॥ २ ॥ या लागी श्रोत्यांवक्त्यासि विनंती ॥ मी करितसें वात्सल्यस्थिती ॥ ग्रंथ वाचावया यथामती ॥ परि खोडीमाडी निश्चिती न करावी ॥ ३ ॥ ॥ श्रीरस्तु ॥ ॥ श्री ॥ ॥ ३२५ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्री ॥

---

१३ व्याकरणदृष्ट्या शुद्ध रूप 'ईशाने' असें आहे.

१४ "यष्टिशिष्टाम्' असें वाचावें. वास्तविक व्याकरणदृष्ट्या शुद्ध रूप 'शास्तु' असें पाहिजे; कारण 'शास्' हा धातु परस्मैपदी आहे.

१५ वृत्त– स्रग्धरा. येथें लेख संपल्याची खूण म्हणून 'म्' अक्षरावर लांब रेघ काढली आहे.

* ३८ वें संमेलन (श. १८७३ इ. १९५१)

वरील ओव्या दुसऱ्या एखाद्या प्रतींत आल्याचें स्मरण तरी नाहीं. नवीन वाटतात. त्या या पोथीच्या लेखकानें लिहिल्या की त्यानें नकललेल्या मूळ प्रतींत होत्या ?

( ६ ) अठराव्या अध्यायाच्या शेवटीं प्रतिलेखनकाल नोंदला आहे तो:-

"शके १६६० प्रवर्त्तमाने संवत् १७९४ वर्षे वृपाकतौ उत्तम श्रावणमासे कृष्णपक्षे प्रतिपदा गुरुवासरे श्रवणनक्षत्रे आयुष्यमानयोगे तद्दिने ज्ञानदेवी समाप्तं संपूर्ण ॥ वटपद्रवास्तव्यं मोढज्ञाती भट्टजीवन इदं पुस्तकं लिखितं राजे श्रीमंत ——————— पठनार्थं शुभं भवतु ॥ येवं संख्या ९७४१ ॥ श्रीज्ञानेश्वरार्पणमस्तु ॥ ॥"

( ७ ) या उल्लेखावरून प्रतिलेखनकाल शके १६६० ( कालयुक्त संवत्सर ) श्रावण कृ. १ गुरुवार असा येतो. मोडक जंत्रीप्रमाणें हा सर्व योग बरोबर येतो. याची खि. तारीख येणेंप्रमाणें – इ. स. १७३८, जुलै २० – व मुसु. तारीख १३ रबिलाखर तिस्सा सलासीन मया व अलफ–म्हणजे ही प्रत थोरले बाजीरावकालीन आहे.

( ८ ) ही प्रत लेखकानें कोण्या श्रीमंत राजासाठीं लिहिली आहे, पण राजाचे नांवाची जागा मोकळी सोडली आहे त्यावरून एक अनुमान असें होतें कीं लेखक धंदेवाईक असावा व राजाचें गिऱ्हाईक मिळतांच नांव घालून ती प्रत त्यांस विकण्याची त्याची सिद्धता असावी.

( ९ ) दुसरी लक्ष्यांत घेण्याजोगी गोष्ट ही कीं, ही जुनी मराठी पोथी नकलणारा हा लेखक जातीचा मोढवाणी–महात्मा गांधी मोडवाणीच होते–आहे. आणि तो वटपद्र अथवा बडोदा येथील राहणारा आहे. संभव आहे कीं बडोदेकर गायकवाड दमाजीराव यांचे करितांच त्यानें ही पोथी तयार केली असावी. लेखकाचें नांव भट्टजीवन. असे मराठी किंवा संस्कृत पोथ्या लिहिणारे गुजराती किंवा जयपुरी म्हणजे मारवाडी लेखन–व्यावसायिक पेशवाई अंमलांत अनेक आढळतात. मराठी अंमलाच्या आश्रयामुळें, अक्षर चांगलें घटवून हा लेखनव्यवसाय वरील देशी लेखकांनीं बराच अवलंबिलेला दिसतो.

( १० ) या अठराव्या अध्यायाचे समाप्तिप्रसंगीं

शकें पंधराशतें सावोत्तरिं ॥ तारण नावं संवछरिं ॥ येका जनार्दनें अत्यादरिं ॥ गीता ज्ञानेश्वरि प्रतिशोधिली ॥ १ ॥ ग्रंथ पूर्वीच अतीशुद्ध ॥ परि पाठांतरें शुद्धाबद्ध ॥ ते शोधुनीयां येवंविद्ध ॥ प्रतिशुद्ध सिद्ध ज्ञानेश्वरी ॥ २ ॥ नमो ज्ञानेश्वरा निष्कळंका ॥ ज्याचे गीतेची वाचीतां टीका ॥ गीताज्ञान होय लोकां ॥ अतिभाविकां ग्रंथार्थीयां ॥ ३ ॥ बहुकाल पर्वणी गोमटी ॥ भाद्रपदमास कपीलाषष्ठी ॥ प्रतिष्ठान गोदावरी तटीं ॥ लेखनकामाटीं संपूर्ण जाली ॥ ४ ॥

या चार ओव्या याच लेखकानें उतरल्या आहेत. या ओव्यांत मात्र 'ज्ञानेश्वरी' हें नांव दोन वेळीं आलेलें आहे. 'नरोटी'ची ओवी येथें नाहीं. बाकी ग्रंथांत सर्वत्र ज्ञानदेवी हेंच नांव पानांवर आद्यंतीं आहे.

## पुरवणी

(१) या ज्ञानदेवांच्या प्रतिलेखकानें दोन पानें अर्धवट लिहून रद्द केलेलीं आहेत. त्यापैकीं एका पानाचे पाठीवर निराळ्याच अक्षरांत व फिकट शाईनें-पुढील मजकूर आहे. समासांत उजवीकडे

"श्री ज्ञाने
श्वारिचे
पारायणे
११
११
११"

(२) मध्यावर पाप्येडेनार्चितो देव : प्रीयता मे जनार्दनः ॥ ६ ॥

नारायणपरंब्रह्म नारायणपरंतप : ॥ नारायणपरं वेदं सर्व ना × × णात्मकं ॥ ७ ॥

श्रीराम ॐ नमो भगवते वासुदेवाय (रा) मदासचरणी तत्पर राघो विश्वनाथ नीवृत्तिज्ञानदेवसोपानमुक्तापुर्णब्रह्मभगवान्

श्रीराम जयराम जयजय राम दत्तात्रे हेरब—

(३) ज्ञानदेवांच्या पुर्जांतच एक 'ज्ञानेश्वरी गूढभाषा' ग्रंथ निराळ्याच हस्ताक्षराचा शके १६९४ चा आहे. त्या लिहिणाऱ्यासारखें वरील पानावरचें अक्षर दिसतें.

(४) हा राघो विश्वनाथ कोण ? आणि हे संस्कृत श्लोक ॥ ६ ॥

पासून येथें आढळतात तेव्हां पहिले पांच श्लोक लिहिलेलें पान यांत असले तर महाल दिसतें.

(५) हा 'राघो विश्वनाथ' रामदासी दिसतो. रामदासी वाङ्मयांतून कोठें आढळलें तर तपासून पाहिलें पाहिजे.

---

श्री.

# ६ अनुभवामृताची प्रकरणात्मक मांडणी कोणाची ?

( श्री. विश्वेश्वर अंबादास कानोले, नांदेड )

श्री ज्ञानेश्वर महाराजांच्या अनुभवामृत अथवा अमृतानुभव या ग्रंथाच्या स्थूल-स्वरूपाविषयीं अर्थात् त्या ग्रंथाच्या मांडणीसंबंधीं एकदोन नवीन गोष्टी माझ्या लक्षांत आल्या आहेत त्या मी प्रस्तुत टांचणांत आपल्या पुढें मांडीत आहे.

अनुभवामृताचीं हल्लीं जीं दहा प्रकरणें आहेत तीं ग्रंथांतील विषय-विवेचनानुरूप श्री ज्ञानेश्वर महाराजांनींच स्वतः उपयोजिलेलीं असली तरी सोयीच्या दृष्टीनें नंतर

कोणी या ग्रंथाची प्रकरणात्मक मांडणी केली आहे याचा थोडा विचार येथें प्रामुख्यानें करावयाचा आहे. या मुद्यास तोंड फोडण्याचें आद्यश्रेय गुरुवर्य म. म. पोतदार यांचे वडील कै. वामन मोरेश्वर उर्फ बाबा पोतदार यांच्या लेखास यावें लागेल. अनुभवामृत हा मूळ ग्रंथ एकच असावा व सोयीप्रमाणें या ग्रंथाचीं पुढें दहा प्रकरणें पाडलीं असावीं; ही कल्पना बाबा पोतदारांनीं श्रीज्ञानेश्वर दर्शन अध्यात्म खंड भाग २ रा या मधील ॥ श्री ज्ञानेश्वर महाराज व अनुभवामृत ॥ या आपल्या विद्वत्पूर्ण लेखांतून प्रथम मांडली आहे. कै. बाबा पोतदारांचे ते शब्द असे.—

॥ या ग्रंथाचीं एकंदर १० प्रकरणें आहेत. परंतु मुळांत महाराजांनीं निरनिराळीं प्रकरणें पाडलीं असावीं किंवा तीं मागाहून कोणी सोयीकरतां पाडलीं असावीं हा एक प्रश्नच आहे. त्याचें मत्यंतर ग्रंथांतच थोडेसें आहे. तें असें कीं कांहीं प्रकरणाच्या शेवटची ओवी व पुढील प्रकरणाची प्रथम ओवी एकदमच क्रमवार झाल्या असाव्या असें दिसतें. यावरून हीं प्रकरणें मूळपासूनच तुटक अशीं लिहिलेलीं नसावींत असें दिसतें. व अशी तुटक प्रकरणें नसलेली एक हस्तलिखित प्रतहि आमच्या पहाण्यांत आलेली आहे– प्रकरण ७–८–२–३ व ५–६ यांतील ओव्या एकाची शेवटची व दुसऱ्याची पहिली ताडून पाहिल्यास हा भेद दिसतो. परंतु हल्लीं पाडलेलीं प्रकरणें हीं सोयीच्या दृष्टीनें ठीकच आहेत."

पण आतां अनुमान करण्याची कांहीं जरूरच राहिली नाहीं. बाबा पोतदारांच्या अवलोकनांत प्रकरणें न पाडलेली अशी एक हस्तलिखित पोथी आली असल्याचें वर म्हटलेंच आहे. आतां शके १६०० मधील प्रकरणें नसलेली व मूळ एकच ग्रंथ असलेली अनुभवामृताची प्रत्यक्ष पोथीच उपलब्ध झाली आहे. या पोथीच्या आधारें आपणास अनुभवामृताच्या मूळ मांडणीविषयीं व स्वरूपाविषयीं निश्चित मत करतां येतें.

या पोथीचा विशेष म्हणजे अथपासून इतिपर्यंत ८०० ओवींचा हा एकच प्रबंध आहे. इतर हस्तलिखित पोथ्यांतून किंवा अनुभवामृताच्या छापील प्रतींतून या ग्रंथाचीं दहा प्रकरणें आढळून येतात तीं या पोथींत नाहींत. अनुभवामृताच्या या अपूर्व पोथी-संबंधीं थोडी माहिती अशी—

पोथीच्या प्रारंभीं 'श्रीमद्द्वैतवादिगुरूवेनमः' लिहून "ब्रह्मानंदं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिं॰" हा सद्गुरुनमनपर श्लोक दिला आहे. नंतर "मूलाय ग्रामभध्याय मूल-मध्याय मूर्तये..... २ यदक्षरमनाख्ययेमानंदमजमव्ययं । श्रीमंनिवृत्तिनाथेतिनिर्वातं दैवमाश्रयेत् ॥ ३ ॥ इत्यादि अनुभवामृताच्या सुरवातीस आढळून येणारे मंगलाचरणाचे पांच संस्कृत श्लोक दिले आहेत. आणि नंतर अनुभवामृतांतील पहिली ओवी ॥ येसी निरोपाधिकें : जिथे जगाची जनकें : तिये वंदिली मिया मुळिकें : देवोदेवीं : ॥ ७ ॥ ही ओवी दिली आहे. या ओवी पुढें एकाचे ऐवजी ७ चा आंकडा टाकला आहे हें विशेष

## ६ अनुभवामृताची प्रकरणात्मक मांडणी कोणाची ?

आहे. यावरून पहिले संस्कृतचे पांच श्लोक हे मूळ ग्रंथांतील श्रीज्ञानेश्वर-विरचित असल्याचें याप्रमाणें सूचित केलें आहे. यानंतर शेवटपर्यंत ग्रंथाची मांडणी एकच आहे. मध्यंतरीं प्रकरणें वगैरे कांहीं नाहींत. संस्कृतचे सुरवातीचे श्लोक आणि ओव्या मिळून एकच प्रबंध आहे. ग्रंथाच्या शेवटची ओवी पुढीलप्रमाणें आहे.

॥ ऐसी स्या ईश्वरी : आंगुली न भेटे दुसरी : किंचतुना सरोभरी : सिंवेसी तो ॥८००॥ इतिश्री अनुभवामृत संपूर्णमस्तु ॥ छ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ।

या ओवीनंतर इतर हस्तलिखित प्रतींत किंवा छापील ग्रंथांत शेवटची म्हणून समजली जाणारी खालील ओवी

॥ म्हणूनि ज्ञानदेवो म्हणे । अनुभवामृत येणें । तणु भोगिजे सणे । विश्वाचेनि ।

या पोथींतून लिहितांना गळाली असावी. किंवा प्रतिलेखकानें ज्या मूळ पोथीवरून ही प्रत केली असावी त्यांतच ही ओवी नसेल; कांहीं निश्चित सांगता येत नाहीं. सामान्यतः ग्रंथाच्या अगदीं शेवटची ही महत्त्वाची ओवी प्रतिलेखक लिहितांना विसरणें शक्य वाटत नाहीं. कारण कांहीं असो ही ज्ञानेशाची ग्रंथसमाप्तीची ओवी या पोथींत नाहीं हें खरें.

प्रतीच्या शेवटीं पुढीलप्रमाणें कालनिर्देश केला आहे. ॥ श्रीमनृपशालिवाहन शके १६०० वर्षेका कालयुक्त नाम संवछरे श्रावण शुद्ध त्रयोदशी दिने समाप्तोयं ग्रंथः ॥

प्रतीच्या शेवटीं प्रतिलेखकाचें नांव आढळत नाहीं. पोथी जवळ जवळ शाबूत आहे. पण शेवटचीं मधीलच एक दोन पानें आढळत नाहींत. पावसाच्या पाण्यानें कागद चुरूट व तुकडे पडण्यासारखा झाला आहे. प्रतिलेखकाचें अक्षर फारच सुंदर, वळणदार व भरघोस दिसण्यासारखें आहे. पोथीचीं पाठपोठ मिळून एकंदर ८० पृष्ठें आहेत. दर पृष्ठास ११ ते १२ अश्या ओव्या आहेत. ओव्यांत चरणापुढें उभ्या रेघा ऐवजी दोन टिंबें दिलेलीं आढळतात. हा प्रकार नाथपूर्वकालीन जुन्या हस्तलिखित पोथ्यांतून आढळतो. शब्दाचीं रूपें व पाठ आहेत तसेच जुने ठेवण्याची विशेष दक्षता प्रतिलेखकानें घेतलेली दिसून येते. त्यामुळें शके १६०० ची जरी ही पोथी असली तरी अनुभवामृताच्या जुन्या भाषेची व मूळ संहितेची थोडी कल्पना आणून देणारी महत्त्वाची व अभ्यसनीय अशी ही प्रत आहे यांत शंका नाहीं. अजून त्या दृष्टीनें पोथीचें यथार्थ अवलोकन झालें नाहीं. केवळ येथें धांवतें निरीक्षण केलें आहे आणि तेंहि अनुभवामृताच्या मूळ व प्रकरणात्मक मांडणीच्या प्रश्नास धरूनच.

शके १६०० च्या अनुभवामृताच्या या प्रतीवरून एक गोष्ट प्रामुख्यानें सिद्ध झाली आहे कीं, श्री ज्ञानेश्वर महाराजांनीं अनुभवामृत हा ८०० ओव्यांचा मूळ एकच प्रबंध लिहिला. ही गोष्ट निर्विवाद गृहीत धरण्यास हरकत नाहीं. मग हीं प्रकरणें केव्हां अस्तित्वांत आलीं? या प्रश्नाचें उत्तर मी यथामति आपणापुढें मां-

आहे. ज्ञानेश्वरीप्रमाणेंच अनुभवामृत या ग्रंथावरहि श्री एकनाथ महाराजांच्या काळांत शोधसंस्कार झाला असला पाहिजे. नाथांनीं अनुभवामृतावर टीका वा विवरण लिहिलें असल्याचें सांगण्यांत येतें. पण नाथांचा असा ग्रंथ आजतागायत तरी उपलब्ध नाहीं. अनुभवामृताचें अमृतानुभव हें दुसरें नांव व या ग्रंथाची दशप्रकरणात्मक मांडणी याच काळांत झाली असावी असें वाटतें. दुसरा पुरावा मिळत नाहीं तोंपर्यंत मी पुढें मांडित असलेली माहिती गृहित धरण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. शिवकल्याणानें अमृतानुभवावर " नित्यानंद दीपिका " नांवाची जी सुप्रसिद्ध टीका लिहिली आहे ती सर्वांच्या अवलोकनांत आहे. या ग्रंथाच्या कांहीं अध्यायाच्या शेवटील शेवटील समारोपात्मक ओव्या आपण बारकाईनें पाहिल्या तर असें दिसून येईल कीं या ग्रंथांत शिवकल्याणानें अनुभवामृत हा मूळ एकच ग्रंथ आहे व प्रकरणें नंतरचीं आहेत हें वारंवार सांगितलें आहे. शिवकल्याणाच्या खालील उद्गारावरून अनुभवामृताचीं दहा प्रकरणें याच ग्रंथकारानें प्रथम पाडलीं असावीं असें निश्चित अनुमान करावेंसें वाटतें.

अनुभवामृताच्या शिवकल्याणी टीकेंतील दहाव्या प्रकरणांतील शेवटच्या विस्तृत समारोपाच्या ओव्या पहा.

॥ इये सुधारस डोहीं । प्रकरण प्रांतु कांहीं नाहीं ।
परि निरुपण–प्रवाहीं । प्रकरण संधि ॥

म्हणौनि दशधा भेदहीन । ग्रंथराज दश प्रकरण ।
यातु नवा भक्तिवरि जाणा । दाहावि हे स्त्छती ॥

ते हे दाहवे प्रकरण । संपविलें येथें विवरण ।
येणे प्रीति पावो पूर्ण । परम पुरुप ॥ ( शिवकल्याणी टीका )

× × ×

याच दहाव्या प्रकरणांत शिवकल्याणानें अनुभवामृतास " अष्टशतमूळ प्रबंध " असें स्पष्ट संबोधून दहा प्रकरणांत या ग्रंथाचें पुढें विवरण केलें आहे असें म्हटलें आहे.

॥ तेणे माझे मिष करून । दाविले हे ग्रंथविवरण । त्यांत आरंभि मंगलाचरण । स्वतंत्र केले ॥ या उपरि पंच श्लोके करूण । मूळ ग्रंथिचे मंगलाचरण । ते सटिक प्रस्थान । संपादिले ॥

या उपरि भाषा वोवीबंध । अष्टशत मूळ प्रबंध ।
तो दाहा प्रकरणीं विविध । विवरिला ग्रंथु ॥
प्रथमी प्रकृति पुरुप वंदन । दुजे गुरूचे स्तवन ।
तिजे वाचा ऋणोत्तीर्ण । अवसान केले ॥

## अनुभवामृताची प्रकरणात्मक मांडणी कोणाची ?

६ अनुभवामृताची प्रकरणात्मक मांडणी कोणाची ?

चौथा शुन्यवाद खंडिला । ज्ञानाभेदुहि दाविला ।
सच्चिदानंदही वर्णिला । पांचवा प्रकरणी ।
षष्टि शब्द खंडन केले । सप्तमी अज्ञान अभावा आणिले ।
अष्टमि उत्तरिले । ज्ञान फुंजाते ॥
नवमि सिद्धाचि रहणी । दशमी ग्रंथोद्भवाची कडसनि ।
इये रिती ग्रंथ वोवणि । प्रवाहे आलि ॥
एवं हे ग्रंथविवरण । केले यथामति करूण ।
नातरी श्री नित्यानंदु आपण । उद्गारला स्वना ॥

× × ×

आतां श्लोकार्थ गहन । त्याचे सविलास विवरण ।
करितां ग्रंथावसान । येथिचे हो पाहे ॥
पुढे भाषापद विलासे । अष्टशतावधि विशेषे । महाराजे घातलिसे ।
अमृतपोहे ॥ (मंगलाचरण संस्कृत श्लोक)

× × ×

अध्याय ६ मध्येंहि शिवकल्याणानें पुढील ओवींत असाच अभिप्राय व्यक्त केला आहे.

॥ आधीच शब्द खुंटला । तो खंडून प्रकरणार्थ केलां । श्री मन्नित्यानंदे मांडिला ।
नावेक खेळु ॥

× × × ×

शके १५५७ मध्यें शिवकल्याणानें अनुभवामृतावर नित्यानंददीपिका ही टीका लिहिली असल्याचें प्रसिद्धच आहे. ( कलयुग प्रथम चरण । विख्यात शक शालिवाहन । पंधराशेसतावन । संवत्सरगणना ॥ ) या ग्रंथांत शिवकल्याणानें अनुभवामृत हा अष्टशत मूळ प्रबंध असल्याचें स्पष्ट केलें आहे. शके १६०० ची अनुभवामृतांची एकच प्रबंध असलेली प्रत हा प्रत्यक्ष महत्वाचा पुरावा आहे. आता या सिद्धांतास अन्य पुराव्याची गरज भासत नाहीं. मूळ प्रबंधाचीं दहा प्रकरणें शिवकल्याणानेंच ग्रंथार्थं स्पष्ट करण्याच्या हेतूनें पाडलीं असावींत असें त्याच्या नित्यानंद–दीपिकेंतील वर दिलेल्या उद्गारावरून वाटतें. शके १५५७ पूर्वीच्या अर्थात् शक १५०० च्या सुमाराच्या प्रकरणें पाडलेल्या अनुभवामृताच्या जर पोथ्या उपलब्ध झाल्या तरच शिवकल्याणास प्रकरणात्मक मांडणीचें श्रेय लाभणार नाहीं. तोंपर्यंत अनुभवामृताच्या दश प्रकरणात्मक मांडणीचें जनकत्व शिवकल्याणासच देणें उचित ठरेल. शिवकल्याणाच्या अनुभवामृतावरील टीकेनंतर केवळ ४३ वर्षांनीं लिहिलेली ही अनुभवामृताची शके १६०० मधील प्रत आहे. या कालापर्यंत तरी प्रकरणें नसलेल्या व मूळ एकच प्रबंध असलेल्या अनुभवामृताच्या पोथ्या लिहिल्या जात असाव्यात असें वाटतें. पुढे पुढें दोनशें वर्षांत मूळ प्रबंधाच्या

(१५) गुरुकृपा व योगस्थिति.

(१६) आत्मनिवेदन व ग्रंथसमर्पण.

यांतील पुष्कळ गोष्टी सामान्य वाचकांस नवीन वाटतील व त्यांची जिज्ञासा वाढवितील म्हणून कांहीं गोष्टींची विस्तारपूर्वक मुळाबरहुकूम माहिती देणें इष्ट वाटतें. उदाहरणार्थ, प्रारंभींच दिलेला सृष्ट्युत्पत्तिक्रम घेऊं. तो येणेंप्रमाणें दिलेला आहेः–

"परंपद। परमध्यें शिव। शिवमध्यें शक्ती। शक्तीमध्यें नाद। नादांत बिंदु। बिंदुंत सदाशिव। सदाशिवांत महेश्वर। महेश्वरांत रुद्र। रुद्रांत विष्णु। विष्णुंत ब्रह्मा। ब्रह्मामध्यें आत्मा। आत्म्यामध्यें आकाश। आकाशांत वायु। वायुंत अग्नि। अग्नित पाणी। पाण्यांत पृथ्वी। पृथ्वींत औषध। औषधांत अन्न। अन्नांत नर–मृग–पक्षी–स्थावर–जंगम हे उत्पन्न जाहले."

यांतील विशेषतः प्रारंभींच्या विवेचनास अन्यत्र संस्कृत ग्रंथांत कोठें आधार आहे तें मला माहित नाहीं. पण यांतील शिव, शक्ति, नाद, बिंदु, सदाशिव, महेश्वर, रुद्र, विष्णु, ब्रह्मा, वगैरे शब्द लौकिक अर्थाचे नसून ते कांहीं एका विशिष्ट पारिभाषिक अर्थानें वापरलेले असावेत असें वाटतें. परंतु तत्संबंधींचा खुलासा ग्रन्थान्तरीं आढळत नाहीं.

मनुष्याच्या शरिराचें प्रमाण देत असतांना प्रत्येक माणसाचें शरीर त्याच्याच अंगुळीनें ९६ अंगुळी असते, उंची ७ विती व रुंदी ४ विती असते; अंतर्भागीं ३२ हात थोरलीं आंतडीं, ९२ संधि, ७२ मोठीं हाडें व साडेतीन कोटि रोमद्वारें असतात ही माहिती मनोरंजक आहे.

या पंचमहाभूतात्मक शरिरांत एकूण ९६ तत्त्वें असतात असें म्हटलें आहे. परंतु तेथील परिगणनेप्रमाणें पाहिलें असतां ही संख्या ९३ च भरते. प्रतलेखकानें कदाचित् एखादा उल्लेख गाळला असावा. या ९६ तत्त्वांचीं स्थानें, नांवें, स्वरूपवर्णन, क्रिया, साधनें यांचीं सविस्तर माहिती देण्याचा ग्रंथकर्त्यांचा उद्देश स्पष्ट दिसतो. परंतु तो कांहीं बाबतींत अपुरा असल्यानें प्रतकाराची त्यासंबंधीं गलती झाली कीं मूळग्रंथांतच हा भाग नाहीं हें समजण्यास मार्ग नाहीं. पंचमहाभूतात्मक शरिराचीं अंगोपांगें, त्यांचीं शरिरांतील संबंध-पंचकें (?) अधिदेवता आणि वर्ण यांचें वर्णन विशेष उल्लेखनीय आहे. या पंचमहाभूतांच्या पंचतन्मातृका व पांच शक्ति दिलेल्या आहेत त्या येणेंप्रमाणें :

(१) पृथ्वी (भूमि) – लकार मातृका, क्रियाशक्ति.

(२) आप – उकार मातृका, ज्ञानशक्ति.

(३) तेज (अग्नि) – मकार मातृका, इच्छाशक्ति.

(४) वायु – इकार मातृका, आदिशक्ति.

(५) आकाश – अकार मातृका, पराशक्ति.

" पंचभूतास आश्रय केलेल्या ह्या पांच शक्ति. मातृका म्हणजे बीज. येणेंप्रमाणें आत्मा आहे." असें ग्रंथकर्त्यानें म्हटलें आहे.

या मानवदेहास आधारभूत अशीं जीं षट्चक्रें आहेत तीं अशीं: (१) आधार (२) स्वाधिष्ठान (३) मणिपूरक (४) अनाहत (५) विशुद्ध (६) आज्ञा. या षट्चक्रांचें वर्णन अनेक ठिकाणीं आलेलें आपल्या परिचयाचें आहे. पण येथें तें विशेषप्रकारें दिलें आहे. तो प्रकार असाः—

### (१) आधार अथवा भूमिचक्र :

" मनुष्य बसते वेळीं दोनी जांघाडाचे मध्यभागी शिश्न आहे. त्या शिश्नासही गुदस्थानामध्यें एक चडक आहे. तेथें पद्माकार आहे. त्यामध्यें एक त्रिकोण आहे. तेंच आधारचक्र होय. त्यास चार दळें आहेत. चार अंगुळें उंच, **रक्त वर्ण, पृथ्वी ऋषी, विनायक देवता, सिध्दिबुध्दि शक्ती, भूमि मुद्रा, तुर्या स्छान, अग्नि स्छान.** येथेंच कुंडालिणी आहे. मातृका ४ : वं शं षं सं, सोहं मंत्र जप–६००. हें भूमिचक्र. "

### (२) स्वाधिष्ठान अथवा उदयचक्र :

" या (भूमि–) चक्रास दोन बोटांवर शिश्नस्थानीं दुसरें स्वाधिष्ठानचक्र. **पीत वर्ण** षडंगुळें ऊंच; सहा दळें आहेत. **आप ऋषी, ब्रह्मा देवता, सावित्री शक्ती, पक्षी मुद्रा.** येथें अमृतवाहिनी आहे. मातृका ६ : बं भं मं यं रं लं. सोहं जप ६०००. हें उदयचक्र. "

### (३) मणिपूरक अथवा अग्निचक्र :

" या (उदय) चक्रास आठ बोटावर–नाभिस्छानीं–तिसरें मणिपूरचक्र–कोमडीचे अंडापरी आहे. **कर्पूर वर्ण.** १० अंगुळें ऊंच. दहा दळें आहेत जा(ज्या)वर बाहत्तर हजार नाड्या आहेत. त्या एकेक नाडीस एकेक चक्र वेगळें वेगळें आहे. **तेज ऋषी. विष्णु देवता. लक्ष्मी शक्ती, पीठ मुद्रा.** येथें पवन मुळीं आहे. मातृका दहा : डं ढं णं तं थं दं धं नं पं फं. सोहं जप ६०००. हें अग्निचक्र."

### (४) अनाहत अथवा वायुचक्र:

" या (अग्नि) चक्रास दहा बोटावर–हृदयस्छानीं–चौथें अनाहतचक्र. १२ अंगुळें ऊंच. वीस दळें आहेत. **रक्त वर्ण. पवनऋषी. रुद्र देवता. उमा शक्ति. लिंग मुद्रा. सुषुप्ती स्छान–सूर्य–स्छान–मनस्थान–हंसजीवात्मा स्छान.** मातृका १२: कं खं गं घं ङं चं छं जं झं ञं टं ठं. सोहं जप ६०००. हें वायुचक्र. "

### (५) विशुद्ध अथवा आकाशचक्र:

" या (वायु) चक्रास बारा अंगोळी वर घांटीकडे पांचवें विशुद्ध चक्र. सोळा अंगुळें ऊंच. सोळा दळें आहेत. **मुक्त वर्ण. आकाश ऋषी. जीवात्मा देवता. माया**

**शक्ति. पंच मुद्रा. स्वप्न स्थान.** मातृका १६ : अ आ इ ई उ ऊ ऋ ॠ ऌ ॡ ए ऐ ओ औ अं अः. सोहं जप १०००. हें आकाशचक्र."

**(६) आज्ञा अथवा मनश्चक्र:**

"या ( आकाश ) चक्रास दहा बोटावर भ्रूयुगस्थानी साहावें आज्ञाचक्र. भ्रूयुग म्हणजे डोळ्यामधील प्रदेश. **जांबूनदसुवर्ण वर्ण.** दोनि अंगुळें उंच. दोनी दळें आहेत. **अहंकार ऋषी. परमात्मा देवता. डाकिणी आविद्या शक्ती. प्रकाश मुद्रा चन्द्र स्थान मन स्थान–सुषुम्ना स्थान.** मातृका २ : हं क्षं सोहं जप १०००. हे मनश्चक्र."

या प्रसिद्ध चक्रांसेरीज आणखी एक सातवें चक्र या ग्रंथकारानें दिलें आहे.

"या ( मनः ) चक्रास ब्रह्मकपालापरियंत सातवें सहस्त्रदळचक्र. **नाना वर्ण. नाना ध्वनि. नाना मातृका. कोटिसूर्यप्रकाशः. सहाचक्रांसहीं, अजपामंत्रासहीं मूळस्थान. जीवात्मा ऋषि. स्वयंज्योति सद्गुरु देवता. आत्मप्रभा शक्ति आकाश मुद्रा** मातृका अकार. सोहं जप १०००. हेंच मेरुशिखर. हेंच पूर्णमंडळ.

"एवं सोहं मंत्रजप श्वासोश्वासरूपानें एकवीस हजार सहाशें होत आहे. याचा तिजाई भाग–सात हजार दोनशें जप दर दिवसीं नाश होत्याकरितां."

यानंतर केलेलें मंडळत्रयाचेंहि वर्णन उल्लेखनीय आहे.

१. "**अग्निमंडळ** भूमिबरोबर आहे. मध्ये त्रिकोण आहे. भूमि हीं उदक दोनी मिळाले ठायीं चतुर्दळ पद्म आहे. त्यावरी पंचाक्षरी आहे. "ॐ न्हीं श्रीं हं सं" हा मंत्र आहे."

२. "आतां सूर्यमंडळ सांगतों:–केळीचे फुलाचे कळीसारिखें. अधोमुखानें अष्ट-दळ पद्म आहे. सुवर्णवर्ण. मातृका ८. यं रं लं वं शं षं सं हं."

३. "आतां चंद्रमंडळ वदतोः रवि अग्नि चंद्रप्रभेनें डोईत आहे; ते सतरावी–निरंजनी–अमृतकळा–अग्निमंडळावर संततोत्धारानें स्वामृत वर्षीत आहे. या चक्रावर पराशक्ती आहे. जे तुर्यानाम्नी परब्रह्माची भार्या आहे."

या नंतर नाडीविवरण. परंतु तत्संबंधींची सामान्य कल्पना पुष्कळांस असल्यानें त्याबद्दल निष्कारण वर्णन विस्तार करण्याची जरुरी नाहीं. परंतु त्यांतील कांहीं सुत्रें लक्षांत ठेवण्यासारखे आहेत:

"पिंगळानाडी मुळाधाराहून कपाळपरियंत येऊन तेथें आहे तें अग्निमंडळ व्यापून फिरून उतरून उजवे नाकाचे वाऱ्याकडून स ः र अक्षरानें बाहेर बारा अंगुळें येऊन चार अंगुळें नष्ट होऊन बाकी आठ अंगळें हकार अक्षरानें आंत जाय."

"इडा नाडी मूलाधाराहून कपाळपरियंत येऊन लागून तेथें आहे तें चंद्रमंडळ व्यापून तेथून उतरून डावे नाकाचे श्वासानें सोळा अंगुळें बाहेर सकार शब्दानें येऊन चार अंगुळें नष्ट होऊन बाकी बारा अंगुळें हकारानें आंत जाय."

"**त्रिमूर्ति स्वरुपानें** शुषुम्ना नाडी सूर्यमंडळपरियंत राहिली आहे. या नाडीचे वर ब्रह्मरंध्र आहे."

"यमुनानदी–इडा–चंद्र हीं तीनीं नांवें डावे नाकाचे श्वासाचीं. गंगानदी–पिंगळा–सूर्य हीं तीनीं नांवें उजवे नाकाचे श्वासाचीं. सरस्वती–शुषुम्ना–अग्नि हीं तीनीं नांवें ब्रह्मनाडीचीं. ह्या तीनी नाडी (नाड्या) नासिकाग्राकडेच मिळाल्या आहेत. कानाचें रंध्र आणि नाकाचें रंध्र तेथें आहे–म्हणून सकळ शास्त्रांत कुंडली स्थळ–द्वादशांत–चतुष्रंध्र–त्रिकुट–त्रिवेणीसंगम – मुक्तिद्वार–नादबिंदू – कळापूर्ण–स्मशान – गोल्हाटमंडळ–द्विदुळचक्रांत हंसरूपानें परमात्मा आहे." असें सांगितलें आहे.

या शरिरांत परमात्मा कोठें, कोणत्या रूपानें आहे त्याची संस्कृत ग्रंथाधारें माहिती दिली आहे. ती अशी:

"नाभिकमलांत ज्योतिरूप, हृदयकमलांत सूर्यबिंबाप्रमाणें, भ्रूयुगद्ळांत हंसरूप आणि सहस्रद्ळ कमळांत (ब्रह्मकपालांत) ब्रह्मरूपानें परमेश्वर आहे."

हें ब्रह्मदर्शन कसें करायचें हा मुख्य प्रश्न. त्यासाठीं ध्यान, राधायंत्र, षण्मुखी व शांभवी या चार मुद्रा व मंत्र, लय, हठ आणि राजयोग आचरण्यास सांगितले असून त्यांचा तपशीलहि दिलेला आहे. त्याचा थोडक्यांत मथितार्थ असा:

(१) **मंत्रयोग**–शुचिर्भूत स्थळीं पद्मासन घालून नासिकाग्रावर दृष्टि स्थिर करून, डोळे झांकून, देवताध्यान व गायत्र्यादि मंत्रजप ब्राह्मणबुद्धीनें करावयाचा हीच ध्यानमुद्रा व हाच मंत्रयोग.

(२) **लययोग**–भ्रूयुगांत दोन्ही दृष्टी एक करून तर्जनीनें दोन्ही कान झांकून क्रमाक्रमानें जे दशविध नाद ऐकूं येतात त्यांतील पहिले ९ अभ्यासानें टाकून दहाव्या मेघ नादांत चित्तवृत्तीचा लय करायचा. हाच प्रणवनाद अ उ म ई इकार मिळून झालेला आहे. या अनाहत शब्दांत होणाऱ्या सोहं नादांत परंज्योती आहे. त्या ज्योतींत मन गेलें तर तें प्रकाशरूप होतें. तेंच विष्णूचें परमपद म्हणजे ब्रह्मसाक्षात्कार होय. हा लययोग म्हणजेच राधायंत्र.

(३) **हठयोगः**– डाव्या पायाची टांच गुदस्थानीं व उजव्याची बेंबीकडे ठेवून अंगठ्यांनीं दोनी कान, अनामिकांनीं नाकपुड्या, माध्यमिकांनीं दोन्ही डोळे झांकून, रेचक पुरक कुंभक त्राहटकानें साधून, अंतर्भेदून, यानेंच प्रणव घडवून; जाळंदर ग्रंथिभेदनेनें सुषुम्ना नाडीनें सहस्रआर पावेतों आणून तेथें असणाऱ्या ज्योतिस्वरुपांत जीवास ठेवणें. हा हठयोग. हीच, षण्मुखी मुद्रा–केवळ कुंभक–सिद्धासन.

**(४) राजयोगः–** यांस सात नांवें आहेतः उन्मनी, मनोन्मनी, सहज, अमनस्क, जाड्यनिद्रा, योगनिद्रा आणि राजयोग. हा त्रिविध आहे. तारकयोग, पूर्वयोग, पूर्वापरयोग.

तारकयोगांत शुचिस्थळीं योगासन घालून महावाक्यमंत्र स्मरणपूर्वक भ्रूयुगांत दृष्टि मिळवून दिवसानुदिवस साधन करितां करितां अनेक प्रकारचा प्रकाश क्रमाक्रमानें दिसेल. अखेर पौर्णिमेच्या चांदण्यासारख्या प्रकाशांत चिन्मयरूप दिसेल तेंच परब्रह्म होय. त्यास सगुण रूप कल्पिलें असतां शंख–चक्रादि आयुधांसहवर्तमान नारायण भेटतो. असें नित्य तेंच ध्यान करीत गेल्यास सहज–समाधी लागते. मात्र यांत सद्गुरु हवा पाहिजे. हाच तारक–अमनस्क. हेच बाह्यखेचरी. हाच पूर्वयोग.

**राजयोगः शांभवी मुद्रा–** एकांत स्थळीं कृष्णाजिन किंवा दर्भासनावर ऊर्णासन घालून गुरुस्मरणानंतर सोहं मंत्र जपत काळीं बुबुळें पापण्यांखालीं नेऊन थोडी झांकून, मन स्थिर करून निःशब्दकाळीं मध्यरात्रीच्या अंधारांत साधना केल्यास एक मुहूर्त गाढ अंधःकारानंतर पूर्णिमेचा उजेड दिसूं लागेल व त्यांत भगवान् आदिनारायण परब्रह्म कोटिसूर्यप्रकाशानें तालुमूलद्वादशांत प्रकट होईल. तालुमूलद्वादश डोळ्याखालीं आहे त्या हाडापासून डोळे वर चार बोटांपर्यंत आहेत. तो प्रदेश द्वादशांत होय. यामध्यें परमात्मा दिसेल. हीच शांभवी मुद्रा–अधविलोकन–पौर्णिमादृष्टि–राजयोग–खेचरी.

एवढें सांगून ग्रंथकारानें ' उद्दंडयोग व उद्दंड मुद्रा ' असल्याचा निर्देश करून त्यांतील कांहींचीं नांवेंहि दिलीं आहेत. त्यापैकीं लंबिकायोग–साधनेनें अमृतपान करतां येते व सकळ रोगांपासून शरीर मुक्त होऊन आयुष्यवृद्धि होते असें म्हटलें आहे.

या ग्रंथांत परब्रह्माचें स्वरूपवर्णन दिलें आहे तें संस्कृतानुसारीच आहे. " अंगुष्ठमात्र पांढऱ्यावर, श्यामवर्ण पर्वावर, पर्वार्धकर्बुरावर, मसुराप्रमाण नीलावर केवळ सूक्ष्म दिसतें तेंच परंज्योतीस्वरूप परब्रह्म म्हणून समजतात. "

योगसाधन करणाऱ्याच्या शरीरांत उष्णता उत्पन्न झाली असतां तिचें शमन होण्यासाठीं तळपायास लोणी किंवा तूप चोळणें, चांदण्यांत उताणें निजून डोळ्यांतून पाणी येईपर्यंत चंद्राकडे पाहणें, पंचकल्प स्नान करणें, दूर्वांमुळांत जिरें घालून त्यांचा काढा लोण्यासह प्राशन करणें, इत्यादि उपचार सांगितले आहेत.

साधकाची या मार्गांत जसजशी प्रगति होत जाईल तसतशी त्याला जे अनुभव येतील त्यांच्या चार अवस्था वर्णिल्या आहेत व त्या [illegible] सांगितल्यापेक्षां अधिक खुलवून सांगितल्या आहेत; त्या चार अवस्था विक्षिप्ता, गतागता, संश्लिष्टा व सुलीनता या होत.

अखेर ह्या गीर्वाण भाषेंतील ईश्वर — पार्वती संवादरूप ग्रंथाचा शेवट— "संचारसमाधी पाव. संसारयोगी हो. सदाहि प्रणवोच्चार विसरूं नको. संसारी असून नसावें. कार्य करून आकर्ता व्हावें. आपण आकाशापरी व्हावें. जनीं वर्तून निरंजनी लक्ष्य ठेवावें, राजयोगी होऊन अणुरेणूंत आपल्यास पहावें. गुरुसेवा करून गुरुस्मरण करावें. गुरुस तनुमनधन अर्पण करून विचारिलें असतां तो बसल्याठाईंच राजराजेश्वर योगानें साक्षात्कार लाभवील. "—ह्या शंकरानें पार्वतीस केलेल्या उपदेशांत झाला असल्याचें या महाराष्ट्र टीकेंत दाखविलें आहे. हीच सामान्यत: गीतेची व ज्ञानेश्वरादि नाथपंथीयांची शिकवण आहे असें दिसतें. किंबहुना ज्ञानेश्वरकृपेनें आपणांस जें परब्रह्म सुख प्राप्त झालें तेंच आपण बोलिलों; असा या प्राकृतांतील ग्रंथकर्त्यानें शेवटीं समारोप करून ग्रंथ विठ्ठलचरणीं अर्पण केला आहे.

या ग्रंथांत कांहीं विशेष प्रकारचे नवीन प्रतिपादन आहे असें नाहीं. कांहीं खुलासे उद्बोधक आहेत. मराठी वाचकांस अवघड विषय सुबोध रीतीनें गद्यांत समजावून सांगितला आहे. जुन्या मराठींत गद्य ग्रंथ कमी. त्या दृष्टीनें पेशवेकालीन या ग्रंथाचें महत्त्व आहे. तंजावरी मराठींत असेंच आणखीहि कित्येक ग्रंथ शोध केल्यास मिळतील. सरकारनें पुढाकार घेऊन या प्रांतांत एक कायमचा संशोधक नेमल्यास अनेक मराठी ग्रंथांचा आपणांस नव्यानें लाभ होईल यांत संशय घेण्याचें कारण नाहीं.

---

## ८ माहिष-शतक

### एक नवी—ग्वाल्हेर—प्रत

(श्री. का. गो. पिंगळे, मातृभूमि कार्यालय, ग्वाल्हेर.)

माहिष-शतककर्ता व त्या काव्याचा टीकाकार यांच्याविषयीं व त्यांच्या काव्याविषयीं रा. सा. गो. वि. पानसे यांनीं मंडळत्रैमासिकाच्या ११३–११४ व्या अंकांत लेख लिहून बरीच माहिती पुरविली आहे. या कामीं त्यांनीं एकंदर ११ पोथ्या उपयोगिल्या असून त्यांच्या श्लोकांच्या क्रमांक व श्लोकसंख्येंत बराच फरक आढळून येतो. आणि रा. पानसे लिहितात त्याप्रमाणें तंजावर पोथी व दक्षिणेकडील इतर पोथ्यांचा एक गट केला म्हणजे काव्याचे १०२ श्लोक मूळचे धरून इतर पोथ्यांतील ३ ते ५ असे कोणते तरी श्लोक प्रक्षिप्त ठरतात. रा. पानसे यांचे मतानें १०२ श्लोकांनंतर १३, २९, ८८, ९१, ९२ हे श्लोक प्रक्षिप्त ठरतात; कारण तंजावर प्रत ह्या श्लोकांचा लेख देत नाहीं. यांत त्यांनीं केवळ १०७ श्लोकी पोथ्यांचाच विचार केला आहे. १०५ श्लोकी पोथ्यांत कोणते श्लोक प्रक्षिप्त ठरूं शकतात, तें निर्णित

केलें नाहीं. उत्तरेकडील पोथ्या १०७ श्लोकी आहेत, आणि त्यांत वरप्रमाणें पांच श्लोक प्रक्षिप्त आहेत एवढेंच त्यांनीं सुचविलें आहे. अड्यार तेलगू प्रत क्षणभर बाजूला ठेवली तरी प्रक्षिप्त श्लोकांचा घोंटाळा कांहीं दूर होत नाहीं. त्यांनीं दर्शविल्याप्रमाणें प्रक्षिप्त श्लोक कोणते आहेत, हें प्रत्येक पोथीच्या क्रमांत (श्लोकांत) फरक होत गेल्यानें निश्चित समजून येणें शक्य नाहीं. परंतु ज्या पक्षीं कांहीं पोथ्यांतून दक्षिणेकडील पोथ्यांपेक्षां कांहीं श्लोक जास्त आढळून येतात त्या पक्षीं कोणत्या तरी एकाद्या अद्याप अज्ञात असलेल्या प्रतींत ते असणें शक्य आहे. आणि या सर्व निर्णयाकरितां जितक्या ज्यास्त निरनिराळ्या प्रती मिळूं शकतील तितकें कार्य सुलभ होऊं शकेल. कदाचित मूळ पोथी आज उपलब्ध नसेल; आणि तसें असावें हें रा. पानसे यांनीं सन १९४६ सालीं प्रसिद्ध झालेल्या श्रीरंगम् आवृत्तीच्या स्पष्टीकरणानें दाखविलें आहेच, म्हणूनच मूळ काव्याच्या नक्कल प्रतींतून जी साधारपणें जुनीं असूं शकेल तिलाच प्राधान्य व प्रामुख्य देऊन मूळ प्रत मानणें योग्य होईल.

आतां प्रत्येक पोथीच्या श्लोकक्रमांत व क्वचित् जागीं झालेल्या पाठभेदांत जो फरक आढळून येतो तो वास्तविक प्रतलेखकाच्या विद्वत्तापूर्ण अभ्यासाचा फरक आहे किंवा 'यादृशं पुस्तकं दृष्ट्वा तादृशं लिखितं मया' या न्यायानें झालेला आहे, याचा निर्णय मात्र थोड्या कष्टानेंच होऊं शकेल. आणि याकरितांच जितक्या अधिक प्रती सांपडतील तितकें चांगलें.

ग्वाल्हेर येथील मातृभूमि कार्यालयाच्या संग्रहीं माहिप-शतकाची एक प्रत आहे. ही प्रत १०५ श्लोकांची आहे. हिला 'ग्वाल्हेर प्रत' असें नांव देऊं. उत्तरेकडील उपलब्ध झालेल्या पोथ्यांतून १०७ श्लोक आहेत. पण ही प्रत उत्तरेकडील असून ही १०५ श्लोकांची आहे. मुंबई व बनारस येथील पोथ्याच काय त्या १०५ श्लोकी मिळाल्या आहेत. उत्तरेकडील 'नीमच प्रत' जी भांडारकर इस्टिट्यूटमध्यें आहे, ती १०७ श्लोकी असून सन १८६१ ची आहे. तंजावर प्रत सन १८२४ ची व अड्यार प्रत १८३४ ची आहे. आणि ह्या दोन्ही पोथ्या 'टीका' असल्यानें त्यांवरून मूळ काव्याला पोषक काळ निघत नाहीं. 'ग्वाल्हेर प्रत' सटीक नाहीं, कुट्टी कवीचें मूळ माहिप-शतक १०५ श्लोकांत यांत नकलून घेतलेलें आहे. ही प्रत शके १७६५ (सन १८४३) ची असून ग्वाल्हेर येथेंच लिहिली गेली आहे. प्रतलेखकानें आपल्या लेखनकालाचें दिग्दर्शन '*व्योमांबरांकभूमित संमत्यानंद शुक्र बहुलाद्ये। गालवपुरांति सैन्ये बुधवारे लेखनं वृत्तं ॥' असें ग्वाल्हेर मानानें विक्रम संवताच्या कालगणनेनें केलें आहे.

---

* संवत् १९०० आनंद संवत्सर, ज्येष्ठ व. १ बुधवार. येथील संवत् दक्षिणेतल्याप्रमाणें कार्तिकादि नसून चैत्रादि आहे व उत्तरेकडे तसा आहेहि. उल्लेखांतील प्रतिपदा तिथीची वृद्धि धरली म्हणजे उल्लेखांतील वार व तिथी इत्यादि सर्व जमते. इ. स. १८४३ जून १४—सं.

रा. पानसे यांनीं आपल्या लेखांत तंजावरी प्रतीवरून जे श्लोकांक दिले आहेत, त्यांत आणि ह्या प्रतींतील श्लोकांच्या मांडणींत जो फरक आहे तो येथें दाखवीत आहे. असें करण्याचा हेतु एवढाच कीं त्यावरून मूळ काव्याच्या श्लोकांचा फरक शक्य तितका कमी होऊं शकेल.

"स्वस्त्यस्तु प्रथमं" व 'ये जाता विमले" हे पहिले दोन आशीर्वादात्मक श्लोक झाल्यानंतर इतर पोथ्यांप्रमाणेंच यांतहि ३ रा श्लोक "धान्यं वाथ" असाच आहे. आणि तोच या जागीं योग्य आहे असें रा. पानसे यांना मान्य आहे. तंजावरी प्रतींतील ३ रा श्लोक येथें ६ वा असून, तंजावरी ६ वा श्लोक "आर्य श्रीधर" हा या ग्वाल्हेर प्रतींत १८ वा असून तो "क्षात्रं विभेम्याहवात" येथेंच पूर्ण न 'होतां वाणिज्यं धनमूलकं तदखिलं त्यक्त्वाश्रितस्त्वामहं। त्वं विद्या च धनं त्व मेव सकलं त्व मे तुलाय प्रभो ॥ येथें पूर्ण होतो आणि त्यानंतर तंजावरी ८ वा श्लोक 'विद्वन् मा' हा येथें १९ वा श्लोक आरंभ होतो. (तंजावरी ७ वा श्लोक येथें २० वा आहे) म्हणजे या जागीं ३ ऱ्या ऐवजीं ६, ६ व्या जागीं १८ व ७ व्या जागीं २० असा फरक झाल्यानंतर पुनः तंजावरी ११ वा श्लोक या प्रतींत १४ वा म्हणून आलेला आहे. श्लोकसंख्या १०२ व १०५ हा क्रम लक्षांत घेतां मधला फरक (६ व १८) सोडला तर ३ श्लोकांचाच फरक स्पष्टपणें ध्यानीं येतो. परंतु वर लिहिल्याप्रमाणें व रा. पानसे यांनाही मान्य असल्याप्रमाणें नकलकाराची लेखणी स्वैर विद्वत्तेनें विहार करीत गेल्याचे दाखलेहि मधून-मधून आढळून येतात. आणि कांहीं जागीं तर पाठभेद आढळतात व ते विशेष ग्राह्य असेंच असल्यानें श्लोकांना कमीपणा न येतां उलट त्यांच्या शब्दसौष्ठवांत भरच पडते.

तिसऱ्या 'धान्यं वाथ' या श्लोकांतल्या ४ थ्या चरणांत 'खलागच्छंतु' च्या ऐवजीं ग्वाल्हेरप्रतींत 'शठास्ते यांतु' असा पाठ आढळतो, तर ७ व्या (२०) श्लोकांत आरंभींच 'विद्यापण्य' च्या जागीं 'प्रज्ञापण्य' व दुसऱ्या चरणांत 'स्वर्णमभूत्वचतांवु' च्या जागीं 'स्वर्णमभूत्तदंबु' असे पाठभेद आढळतात. इतर पोथ्यांच्या नकलकारांविषयीं किंवा पाठभेदांविषयीं सांगतां न आलें, तरी ग्वाल्हेरप्रतीच्या लेखकाविषयीं–पोथीवर त्याचें नांव नाहीं–मात्र तो व्युत्पन्न पंडित होता एवढें सांगतां येईल. अर्थात् नकलकारांनींहि मूळ काव्याची नकल करितांनां आपल्या मताप्रमाणें व प्रज्ञेप्रमाणें त्याच्यावर हातसफाई केली असल्याचें स्पष्ट दिसून येतें आणि म्हणूनच रा. पानसे यांना शंका उपस्थित होऊन संशोधनाकरितां एक नवीन स्थळ अनायासें प्राप्त झालें.

तंजावरी प्रतींत १०२ वा श्लोक ग्वाल्हेरप्रतींत १०५ वा असून त्यांत 'वांच्छानाथ कवेः' च्या जागीं इतर प्रतींप्रमाणें या प्रतींतही 'श्रीनद्दालकवेः' [illegible] आढळतो. आणि यावरूनच नकलकारानें मूळ लेखकाला जें बहुमानार्थी संबोधन [illegible] आहे, तें स्पष्ट होतें.

एवंच, रा. पानसे यांच्या लेखांत अंकित झाल्याप्रमाणें आणखी एक १२ वी प्रत व तीहि उत्तरेकडील असून तंजावरप्रतीच्या ( १८२४ ) बरोबर १९ वर्षांनीं ( १८४३ ) लिहिलेली व बरीच महत्त्वाची अशी आढळली. शिवाय या प्रतींत वरीलप्रमाणें विशेष असा पाठभेदादिकांचा फरक दृष्टीस आल्यानें पुढच्या स्पष्टीकरणासाठीं या 'ग्वाल्हेर प्रतीं'ची माहिती येथें दिली. पोथीपृष्ठसंख्या १८, प्रत्येक पानांत १० ते ११ ओळी व आकार ८" × ४" आहे.

श्री. पिंगळे ह्यांच्या लेखासंबंधानें रा. सा. **गो. वि. पानसे** यांचें म्हणणें पुढीलप्रमाणें—

ग्वाल्हेरहून श्री. का. गो. पिंगळे यांनीं ग्वाल्हेर येथें मातृभूमि–कार्यालयांत असलेल्या माहिष–शतक पोथीची माहिती दिली, त्याबद्दल मी फार आभारी आहें.

रा. पिंगळे यांचे लेखांत पान १ वर मी फक्त १०७ श्लोकी पोथ्यांचा विचार केला व १०५ श्लोकी पोथ्यांचा केला नाहीं म्हणून ५ श्लोक प्रक्षिप्त ठरविले असें ध्वनित केलें आहे. १०५ श्लोकी पोथी ग्राह्य धरली तर २ च श्लोक प्रक्षिप्त ठरतील असें त्यांचें म्हणणें आहे. मीं आजपर्यंत जेवढ्या पोथ्या व पुस्तकें मिळविलीं त्या दरेक पोथींतील अगर पुस्तकांतील श्लोकानुक्रम कसा आहे हें एका तक्त्यांत दाखविलें आहे. हा तक्ता भा. इ. सं. मंडळाचे अंकांत स्थळसंकोचास्तव छापला गेला नाहीं.

त्या तक्त्यावरून स्पष्ट दिसून येईल कीं १०५ श्लोकी ज्या २ च पोथ्या मिळाल्या त्यांत सुद्धां एकसूत्रीपणा नाहीं. एकींत १ श्लोक वगळला तर तो दुसरींत सांपडतो. दुसरींत जो श्लोक नाहीं तो १ लींत आहे. शिवाय १०५ श्लोकी पोथी ग्वाल्हेर येथील सन १८४३ सालची आहे. मीं जी पोथी ग्राह्य म्हणून धरिली ती सन १८१३ सालची व खुद्द वाञ्छेश्वर म्हणजे ग्रंथकाराच्या पणतूनें व पहिल्याच टीकाकारानें लिहिलेली आहे. तशी पूर्वपीठिका १०५ व १०७ श्लोकी पोथ्यांबद्दल आढळून आली नाहीं. म्हणूनच मीं १०२ श्लोकी पोथी व ती सुद्धां तंजावरची ग्राह्य धरिली. श्रीरंगमूची पोथी ३।४ पोथ्यांवरून व त्यांत कांहीं अपुऱ्या होत्या– त्यावरून लिहिलेली म्हणून ग्राह्य धरिली नाहीं.

रा. पिंगळे ह्यांच्या लेखांतील "कुट्टी कवीचे **मूळ** माहिषशतक १०५ श्लोकांत यांत नकलून घेतलेलें आहे." ह्या वाक्यांतील मूळ हा शब्द संदिग्ध दिसतो. मूळ शब्दाचा अर्थ टीका वगळून नुसतें text च लिहून घेतलें असा करावयाचा, कीं "अस्सल" असा अर्थ करावयाचा. जरी मूळ शब्दाचा अर्थ अस्सल केला तरी नक्कल करण्यास अस्सल प्रत कोणती हें सांगतां येणार नाहीं. दुसरें, जर मूळ पोथी १०५ श्लोकी असेल तर खुद्द वाञ्छेश्वर यानें १८१३ च्या पोथींत ३ श्लोक कां वगळले व तक्त्यांत दाखविल्याप्रमाणें १०५ श्लोकी पोथ्या भिन्न भिन्न आहेत तर त्यांतील खरी पोथी कोणती, असा नवीनच प्रश्न उभा राहणार आहे. तेव्हां १०२

श्लोकी अस्सल कीं १०५ श्लोकी हें ठरविलें पाहिजे व १०५ श्लोकी अस्सल ठरल्यास मुंबईची का बनारसची हें ठरवावें लागेल. अशी माहिती उपलब्ध होईपर्यंत सन १८१३ सालची पोथी खरी धरून चालिलें पाहिजे असें माझें मत आहे.

अड्यार १२–एच्–४६ म्हणून जी एक पोथी मी तक्त्यांत आतां समाविष्ट केली आहे ती सुद्धां १०२ श्लोकीच आहे, व ती टीकात्मक असून तंजावर येथील पोथीची नक्कल आहे हें अनुक्रमणिकेवरून दिसून येईल. ही मळ पोथी तेलगू लिपींत आहे व ती देवनागरी लिपींत लिहून पाठविलेली आहे. म्हणून ही पोथीसुद्धां तंजावर येथील पोथीइतकीच विश्वसनीय मानिली पाहिजे.

आतां राहिलेली अड्यार तेलगू 27–F–4 मत. ह्या पोथीचा कालनिर्देश कोठेंच आढळत नाहीं. तरी पण ती फार जुनी आहे असा अड्यार येथील संग्रहालयाचे डायरेक्टरांचा अभिप्राय आहे. ही पोथी संपूर्ण आहे व त्यांत ९५ श्लोक आहेत. ९५ वा श्लोक असा आहे:—

कस्मै चि(न्न)द्ददासि काच–कणिका दर्पस्तु दूरे गिरा
व्याप्तस्त्वं रजसा शरीरमभितो मालिन्यमन्यादृशम् ।
संप्राप्तोसि निरंकुशोसि जगतां माऽऽतंकमंकूरय–
स्यारण्यप्रिय मो(किमत्र) बहुना मृत्युः प्रजानामासि ॥
॥ अयं पञ्चनवतितमः श्लोकः न महिष–शतकीयः ॥

॥ श्रीरस्तु ॥

माहिषशतकं संपूर्णम्

यावरून ९५ वा श्लोक प्रक्षिप्त ठरला. उरलेल्या ९४ श्लोकांवरून पाहतां पुण्याकडील पोथींतील श्लोक ४, ५, ७, १२, १३, १४, १५, १९, ७७, १०३, १०४, १०६ व १०७ असे १३ श्लोक प्रक्षिप्त ठरतात. वरील श्लोकांपैकीं श्लोक १३ हा मात्र फक्त १०७ श्लोकी पोथींत सांपडतो, इतर कोणत्याच पोथींत नाहीं हें मीं पूर्वींच सांगितलें आहे.

तेव्हां कोणते श्लोक प्रक्षिप्त हें ठरविण्याचे अगोदर कोणत्या पोथीवरून श्लोक प्रक्षिप्त ठरले हें दाखविलें पाहिजे व ती पोथी अस्सल अगर अस्सलची नक्कल पाहिजे व हें ठरविण्यास जेवढीं साधनें मिळतील तीं पाहिजेच आहेत. व या वादानेंच वरील प्रश्न सोडविण्यास मदत होईल.

## ९ शिवभारतांतील कांहीं इतिहासदृष्ट्या विचारार्ह स्थळांची चर्चा

(श्री. य. ग. फके मनोहर)

मीं कांहीं दिवसांपूर्वी शिवभारत वाचावयास घेतलें असतां त्यांत अनेक प्रकारचीं न्यूनाधिक्यें व शंकास्थानें मला अढळूं लागलीं. त्यांची नोंद मी निरनिराळ्या कागदांवर करीत गेलों. संस्कृत श्लोकांतील अपपाठ वा अशुद्धें यांच्या नोंदी शंभरांवर झाल्या. संस्कृत श्लोक शुद्ध असतां माझ्या मतें त्यांच्या खऱ्या अर्थाहून भिन्न प्रकारें अनुवाद झालेलीं स्थळें नोंदिलीं. त्यांची संख्या सुमारें सवाशें झाली. तिसऱ्या कागदावर सूचींतील न्यूनाधिक्य नोंदिलें तेंही बरेंच मोठें आहे. पण चौथ्या कागदावर इतिहासदृष्ट्या विचारार्ह स्थळें नोंदिलीं त्यांची संख्या मात्र त्या मानानें अल्प म्हणजे सुमारें वीस–बावीस इतकीच आहे. त्यांतहि कित्येक स्थळें म्हणजे मला आलेल्या किरकोळ शंकाच आहेत. इतिहासाचा माझा व्यासंग नाहीं. शिवकालीन इतिहासाच्या अनेक साधनांपैकीं शिवभारत तेवढें एकच यावेळीं मजपुढें आहे. आणि या भारतास कै. द. वि. आपटे यांनीं जोडलेली प्रस्तावना म्हणजे शिवकालीन इतिहाससाधनांच्या अपार सागराचें मंथन करून काढलेलें अमृत आहे. अशा या प्रस्तावनेंतील कोणत्या विधानांस शिवभारताचा आधार माझ्या समजुतीप्रमाणें मिळत नाहीं, कोणत्या विधानांस मिळाला तरी अल्पांशानेंच मिळतो, पूर्णांशानें मिळत नाहीं आणि माझ्या कोणत्या शंकांचें उत्तर त्या प्रस्तावनेवरून मला मिळालें नाहीं याचा उल्लेख मला करावा लागणार आहे. हा उल्लेख म्हणजे त्या प्रस्तावनेवरील माझे आक्षेप असें कोणी मानूं नये अशी माझी नम्र विनंती आहे. केवळ जिज्ञासेनेंच मी आपल्या शंका आपणां तज्ज्ञांपुढें मांडीत आहें, एवढें प्रथम निवेदन करून मी आतां प्रस्तुताकडे वळतों.

शंकेचा क्रमांक १.—मालोजी भोसल्याचा मृत्युशक निश्चित झालेला नाहीं. त्या शकाविषयीं अनुमान करण्यास साधक म्हणून शिवभारताची प्रस्तावना पृष्ठ ६४ येथें म्हटलें आहे कीं, "विठोजीच्या आठ मुलांपैकीं तिसरा मुलगा, थोरला मालोजी मेल्यानंतर जन्मला असावा व त्याच्याच स्मरणार्थ या मुलाचें नांव मालोजी ठेवलें गेले असण्याचा पुष्कळ संभव आहे." या अनुमानास शिवभारताचा आधार मिळत नाहीं असें मला वाटतें. याचें कारण असें:– शिवभारतांत १ ते ९ अध्यायांत मालोजी भोसल्याचा उल्लेख १५ स्थळीं आला आहे. (यांतील १३ स्थळें सूचींत नमूद आहेतच.) या पंधराहि स्थळीं मालोजीचें नांव **माल** असें दिलें आहे. माल या शब्दापुढें कोठें वर्मा, कोठें भूप इ. शब्द जोडले असले तरी सर्वत्र माल हेंच नांव आहे. मल्ल असें एकाहि स्थळीं नाहीं. विठोजी भोसल्याच्या तृतीय पुत्राचें नांव शिवभारतांत ३/१ मध्यें मल्लः आणि ५/५ मध्यें मल्लराजः असें आलें आहे. दोन्ही स्थानीं मल्ल आहे, माल असें कोठेंहि नाहीं. म्हणून चुलत्याचेंच नांव पुतण्यास ठेविलें असें म्हणण्यास शिवभारताचा आधार नाहीं.

त्याचें मालोजी असें नांव इतरत्र कोठें असलें तरी शिवभारतांत नाहीं; म्हणून मालोजी भोसल्याच्या मृत्युशकाचें अनुमान करण्यास शिवभारतांतील या नांवाच्या उल्लेखाचा उपयोग नाहीं हें स्पष्ट आहे.

२. मालोजीच्या पत्नीचें नांव शिवभा. $\frac{१}{४६}$ मध्यें उमा दिलें आहे व तिचें प्रसिद्ध नांव दीपा असें आहे. यांपैकीं एक सासरचें व एक माहेरचें असावें असें कोणी अनुमानितात. पण या शिवभारतांत कोणत्याही मराठा स्त्रीचीं सासरचें व माहेरचें अशीं दोन नांवें दिलेलीं नाहींत. अन्यत्र कोठें आहेत कीं काय हें तज्ज्ञांनीं पहावें आणि अनेक मराठा स्त्रियांचीं अशीं दुहेरी नांवें आढळत असल्यास त्यांच्या अनुरोधानें उमा व दीपा यांतील सासरचें कोणतें व माहेरचें कोणतें याचा निर्णय करावा. माझ्या समजुतीप्रमाणें अशीं दुहेरी नांवें आढळत नाहींत म्हणून अमुक नांव सासरचें असें म्हणतां येणार नाहीं. दोन्ही माहेरचीं कां असणार नाहींत ?

३. शिवाजीच्या आईचें नांव $\frac{२}{४४}$, $\frac{५}{८३}$ या दोन स्थळीं जिजू असें दीर्घ ऊकारान्त आलें आहे. राजव्यवहार कोश उपोद्घात श्लोक ५० येथेंहि तसेंच ऊकारान्त नांव आहे. या दोन ग्रंथांत आकारान्त नांव कोठेंहि आलेलें नाहीं. संस्कृतीकरण करण्यासाठीं कवींनीं ऊकारान्त रूप केलें असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण संस्कृतांत स्त्रीलिंगी विशेषनामें प्रायः आकारान्त वा ईकारान्त असतात, ऊकारान्त नसतात. तत्कालीन दोन कवींनीं ऊकारान्त नांव दिलें आहे यावरून तसेंच नांव तेव्हां रूढ असावें असें मला वाटतें. जिजाऊ असें ऊकारान्त नांव आढळतें त्याचें संक्षिप्त रूप जिजू असावें व तेंच तेव्हां व्यवहारांत रूढ असावें.

४. $\frac{३}{३}$, $\frac{४}{९२}$ मध्यें विठोजी भोसल्याच्या आठव्या पुत्राचें नांव वक्र व कक्र असें दोन प्रकारें आलें आहे. यांतील खरें नांव कोणतें याचा निर्णय तज्ज्ञांनीं अन्य आधार पाहून करावा.

५. $\frac{४}{९६}$ मध्यें नृसिंह पिंगळे असें एका ब्राह्मण सरदाराचें नांव आलें आहे. नृसिंह पिंगळे हा शहाजी–काळचाच आहे. तो मोरोपंत पिंगळ्यांच्या कुळांतला असला तर त्याच्या वरल्या पिढींतला किंवा त्याच्या पिढींतलाही असूं शकेल. हा मोरोपंत पिंगळ्याचा कोणी आहे काय ? त्र्यंबकेश्वर येथील उपाध्यायांकडे माहिती मिळण्याचा संभव आहे. तेथें पिंगळे याच आडनांवाचे एक उपाध्ये आहेत पिंगळे यांच्या वंशावळीचा शक्य तो शोध ते अवश्य करितील.

६. जाधवरावाच्या एका पुत्राचें नांव $\frac{४}{२६}$ मध्यें अंचल आहे. तेंच सूचींत अचल आहे. यांतील खरें नांव कोणतें ? अचलोजी म्हणजे अचल हेंच नांव असावें. जाधवरावांच्या पांच पुत्रांचीं नांवें दत्त, राघव, अचल, जसवंत आणि बहादूर अशीं शिवभारतांत आलेलीं आहेत ? जाधवरावास हे पांचच पुत्र होते कीं आणखी होते ?

७. ३५ वर शहाजीचा पुत्र संभाजी यास 'अन्वयवर्धन' म्हटलें आहे. त्यावरून त्यास संतति असावी. रियासतींत सुरतसिंग व उमाजी असे त्याचे दोन पुत्र दिले आहेत. जेधे शकावलींत उमाजी (जन्मशक १५७६) आहे सुरतसिंग नाहीं. अफजलखानाचे प्रसंगीं शिवाजीनें उमाजीस आपला वारस ठरविलें होतें असें पोवाड्यांत वर्णन आहे. यावरून थोरला सुरतसिंग पोवाडेकारास माहीत नसावा. किंवा त्याच्या नांवांतील सिंग या शब्दावरून तो लेकवळा असावा. तसें नसतें तर त्यानें थोरल्यास सोडून धाकट्यास वारस म्हणून सांगितलें नसतें. १८७४ त सातारची राणी सगुणाबाई हिनें व्हिक्टोरिया महाराणीकडे पाठविलेल्या कैफीयतीस जोडलेल्या भोसल्यांच्या वंशवृक्षांत संभाजीला औरस पुत्रसंतति दाखविलेली नसून त्यानें उमाजी हा दत्तक घेतला, हा उमाजी म्हणजे विठोजी भोसल्याच्या सहाव्या मुलाचा म्हणजे परसोजीचा पुत्र व तो स्वतः संभाजीनेंच दत्तक घेतला व त्याचे वंशज जिंजी येथें आहेत, अशी माहिती दिलेली आहे. शिवभारतांत संभाजीच्या पत्नीचें नांव जयंती असें दिलें आहे. या वंशावळींत मकाऊ असें दिलें आहे. हें जयंतीचें दुसरें टोपण नांव कीं ही दुसरी पत्नी अशीहि शंका येथें उद्भवते. एकंदरींत या संभाजीच्या संततीसंबंधानें तज्ज्ञांनीं सर्व साधनें पाहून निर्णय करणें अवश्य दिसतें.

८. यापुढें आठवा जो प्रश्न माझ्या मनापुढें उपस्थित झाला तो बराच विवाद होण्याचा संभव मला वाटतो. या प्रश्नासंबंधानें मला थोडे विस्तारपूर्वक लिहावें लागेल. यास्तव माझी विनंती अशी आहे कीं माझें संपूर्ण विवेचन झाल्यावर त्याचें सूक्ष्म परीक्षण करून आपण आपला निर्णय ठरवावा.

दौलताबाद म्हणजेच धारागिरी ह्या किल्ल्यांत फत्तेखान दिवाणासह निजामशहा असतां मोंगलांचें आणि विजापूरचें अशीं दोन्हीं सैन्यें या किल्ल्याकडे आलीं. बरेच दिवस युद्ध झालें आणि निजामासह दौलताबाद मोगलांचे हातीं जाऊन विजापूरचें सैन्य परत गेलें; या ऐतिहासिक दृष्ट्या विशेष महत्त्वाच्या प्रसंगांत एकंदर वृत्तांत कसाकसा घडत गेला याचें सविस्तर विवेचन प्रस्तावना पृष्ठ ९० ते ९२ यांवर आलें आहे. या विवेचनाच्या सत्यासत्यतेविषयीं मला कांहीं म्हणावयाचें नाहीं. यासंबंधांत शिवभारताचा जो आधार दिलेला आहे तो कितपत यथायोग्य आहे एवढ्यापुरतेंच मला बोलावयाचें आहे. हा विषय आठव्या अध्यायांतील ३४ ते ४० आणि ७१,७२ या श्लोकांत आला आहे. या श्लोकांच्या आधारें मी असें म्हणतों कीं, प्रस्तावना पृष्ठ ९० वर विजापूरकरांतर्फे बरेंच मोठें सैन्य मोगलांशीं सामना देण्यासाठीं म्हणून निघालें, या वाक्यांत या सैन्याच्या येण्याचा 'मोगलांशीं सामना देणें' हा जो हेतु सांगितला आहे त्यास शिवभारताचा आधार नाहीं. शिवभारतांत ३४ व्या श्लोकांत 'ताम्रपताकिनी धारागिरिं अवेष्टयत्' मोगलांच्या सैन्यानें धारागिरीत

वेढा दिला असें सांगितल्यावर पुढील ३५ व्या श्लोकांत 'धारागिरिं प्रति लुब्धः येदिलः पृतनां प्रेषयामास' हें महमूदशहानें धारागिरीच्या लोभानें सैन्य पाठविलें असें सांगितलें आहे. 'धारागिरिं प्रति लुब्धः' यावरून धारागिरीच्या लोभानें हें स्पष्ट आहे. येथें मोगलांशीं सामना देणें हा हेतु सांगितलेला नाहीं. मोगलांच्या आधीं धारागिरीस जाण्याचा त्याचा हेतु असावा. प्रस्तावना पृ. ९१ वर पुढील वाक्य आहे. "मोगलांनीं दौलताबादेभोंवतीं वेढा घालून किल्ल्यांत रसद पोंचूं न देण्याची खटपट करावी आणि विजापूरकरांनीं मोगलांची फळी फोडून दाणागोटा किल्ल्यांत पोचविण्यासाठीं पराकाष्ठा करावी असा प्रकार दोन महिने सुरू होता." या विधानासही शिवभारताचा आधार नाहीं, हें माझें म्हणणें विशद करण्यासाठीं वर उल्लेखिलेले ८-३४ ते ४० या श्लोकांचें साकल्यानें परीक्षण करावयास हवें. श्लोक ३७ पहा. "निजामशाहः ताभ्यां द्वाभ्यां अनीकाभ्यां अयुध्यत." निजामशहा त्या दोन्ही सैन्याशीं लढत होता. तो जसा मोगलांशीं तसाच विजापूरकरांशींही लढत होता. विजापूरकर व निजाम यांची जर लढाई होत होती तर या दोन सैन्यांच्या मध्यंतरीं तिसऱ्या मोगल सैन्याचा अडथळा नव्हताच हें उघड आहे. मध्यंतरीं मोगल सैन्य आडवें असतें तर मैत्रीनें असो वा शत्रुत्वानें असो निजाम व विजापूरकर यांची हातमिळवणी झालीच असती कशी? तेव्हां धारागिरीच्या एका बाजूनें मोगल सैन्य व दुसऱ्या बाजूनें विजापूरचें सैन्य धारागिरीवर हल्ला करीत होतें असेंच मानणें अपरिहार्य आहे. पुढील ३८ वा श्लोक पहा. यांत निजामाचा पराभव मोगल व विजापूरकर दोघांनीं मिळून केला असें स्पष्ट म्हटलें आहे. निजाम दोघांशींही लढत होता व दोघांनीं निजामाचा पराभव केला, ह्या भारतकाराच्या म्हणण्याशीं अविरोधी असाच श्लोक ३६ चा अर्थ असणार हें स्पष्ट आहे. क्षणभर या ३६ व्या श्लोकांतील **मिथः** हें व्यामोह उत्पन्न करणारें पद बाजूस ठेवून, म्हणजे तें तेथें नाहीं असें क्षणभर मानून, या ३६ व्या श्लोकाचा अर्थ पाहूं. "साहिजहानस्य महमूदस्यच सैन्यं धारागिरिजिघृक्षया तत्र अयुध्येतां," दोन्ही सैन्यें धारागिरि घेण्याच्या इच्छेनें—अर्थात् धारागिरी ज्याच्या हातीं होती त्या निजामाशीं—लढत होतीं. आतां ३६ ते ३८ या तिन्ही श्लोकांचा अर्थ संक्षेपानें असा होईल.—मोगल व विजापूरकर धारागिरी घेण्यासाठीं तीव्र हल्ले करीत होते. धारागिरीवरून निजामहि त्या दोन्ही सैन्याशीं लढत होता. शेवटीं त्या दोन सैन्यांनीं निजामाचा पराभव केला. हा अर्थ सुसंगत होतो; पण ३६ व्या श्लोकांतील मिथः या पदाची नड दूर झाली तरच. आतां मिथः याचा अर्थ "आळीपाळीनें" असा घेऊन पाहूं. धारागिरीवर मोगल व विजापूरकर हल्ले करीत होते पण एकाच वेळीं ते दोघे हल्ले करीत नव्हते. एक दिवस मोगल तर दुसऱ्या दिवशीं विजापूरकर हल्ला करीत. असा अर्थ घेतला तरच ३७ व ३८ या श्लोकांशीं ३६ वा श्लोक सुसंगत होईल आणि मिथः या शब्दाचा आळीपाळीनें असा अर्थ आहेच. [ संलापो भाषणं मिथः यांतहि

उक्तिप्रत्युक्तियुक्तं यत् भाषणं सः संलापः अर्थात् दोघांनीं मिथः म्हणजे आळीपाळीनें बोलावयाचें असतें. ]

९. १०/४३ मध्यें शिवाजीचें लग्न झाल्याचा उल्लेख आहे. येथें शिवाजीच्या पत्नीचें नांव कवीनें सांगितलें आहे कीं नाहीं ? जो कवि शरीफजीच्या बायकोचें दुर्गा हें नांव देतो, संभाजीच्या पत्नीचें नांव जयंती हें देतो, तो नायकाच्या पत्नीचें नांव देण्यास कसा विसरेल ? सई या मराठी नांवाचें सती असें संस्कृतीकरण त्यानें केलें आहे हें उघड आहे. सई ही तर निंबाळकरांची कन्या. येथें सती प्रवार-कुलसंभवा सांगितली आहे, यावरून निंबाळकरांचें मूळ आडनांव पवार असलें पाहिजे असा निष्कर्ष मीं काढिला व श्री. शंकरराव जोशी यांस सांगितला, तेव्हां तो बरोबर असल्याचें त्यांनीं सांगितलें. हा वृत्तांत सांगण्याचें कारण असें:- अशी एक समजूत ( दंतकथा ) आहे कीं, शिवाजीचें पहिलें लग्न महाराष्ट्रांत झाल्यावर तो विजापूर येथें गेला असतां तेथें बादशहानें त्याचें दुसरें लग्न केलें तें निंबाळकरांच्या मुलीशीं. म्हणजे यास अनुसरून सईबाई ही शिवाजीची दुसरी बायको होते. पण यास शिवभारताचा आधार नाहीं. शिवभारताप्रमाणें प्रवारकुलसंभवा म्हणजे निंबाळकरांची कन्या सईबाई हीच शिवाजीची पहिली पत्नी होय.

१०. १२/११ मध्यें तलजित् भोसल्याचे जागीं बलजित् हवें. शंका अशी कीं हा १२/११, १२/१०१ व २५/४८ या तीन ठिकाणीं आलेला बाळाजी भोसला याचा उल्लेख शहाजीचा बांधव म्हणून १२/१०१ मध्यें आला आहे, हा शहाजीचा बांधव कसा ? याचें व शहाजीचें नेमकें नातें कळूं शकतें काय ? विठोजीच्या पुत्रांत कोणी बाळाजी नाहीं म्हणजे बाबाजी भोसल्याचे भाऊबंदांचे वंश पहावयास हवेत. २५/४८ मध्यें द्वारकाजी, जिवाजी व परसोजी असे आणखी ३ भोसले आले आहेत. यांतील परसोजी हा कदाचित् विठोजीचा ६ वा पुत्र जो परसोजी तो असेल, पण द्वारकाजी व जिवाजी यांचा शहाजी-शिवाजीशीं संबंध कसा जुळतो, हें पाहिलें पाहिजे.

११. अफझलखानानें वाईस आल्यावर शिवाजीकडे दूत पाठवून कांहीं किल्ले व प्रदेश यांची मागणी केली आहे. ती १८/६१ते६३ यांत दिली आहे. यांतील ६१ वा श्लोक असा:--

> सिंहं लोहं महान्तं च प्रचलं च शिलोचयम् ॥
> पुरंदरं गिरिं तद्वत् पुरीं चक्रावतीमपि ॥

येथें शंका अशी कीं पूर्वार्धांत किती किल्ल्यांचा उल्लेख आहे ? अनुवादांत सिंहगड व लोहगड हे दोनच किल्ले धरले आहेत. महांतं च प्रचलं च हीं विशेषणें मानिलीं आहेत. च-कारावरून तीं तशीं मानितां येतील काय अशी माझी शंका आहे. मला वाटतें येथें सिंह, लोह, महांत आणि प्रचळ हीं चारी किल्ल्यांचीं नांवें आहेत.[1] सिंह: आणि लोह हे जसे घाटमाथ्यावरील गड, तसे प्रचळ व महान हे दोन कोकणांतील गड होत.

कल्याण-भिवंडी पासून बाणकोटच्या खाडीपर्यंतचें कोंकण यापूर्वी शिवाजीनें जिंकलें होतेंच. या स्वारीच्या वेळीं शिवाजीनें हरेश्वराचें दर्शन घेतलें. शिवाजीनें जिंकलेला कल्याण-भिवंडीपासून हरेश्वरपर्यंतचा हा जो कोंकण भाग त्यांतील उत्तर भागांत प्रबळ गड आहे. शिवाजी पालखींतून बसून किल्ल्यावर जात असतां बोरीच्या काटीस पालखी अडकली तेव्हां बोर पालखी कां अडविते, येथें कांहींतरी असलें पाहिजे असें म्हणून शिवाजीनें तेथें खणती लावली व त्यास अपार द्रव्य सांपडलें अशी जी दंतकथा आहे ती याच प्रबल किंवा प्रवाल गडासंबंधी आहे. उत्तर भागांत जसा हा प्रबळगड तसाच दक्षिण भागांत घोसाळगड व हरेश्वर यांच्या मध्यंतरीं महान गड आहे. प्रसाद मासिकाच्या आक्टोबर ५० च्या अंकांत महाराष्ट्रांतील किल्ल्यांचा नकाशा आहे त्यांत हे गड दिले आहेत. उत्तर दक्षिणचे हे गड मागणें म्हणजे तो सारा कोंकण प्रदेशच मागणें होय. हे गड गाळले तर वरच्या ६० व्या श्लोकांतील 'सकलान् अचलान् अचलामपि देहि' या मागणीशीं संगति राहणार नाहीं.

१२. प्रस्तावना पृ. १३७ वर पुढील वाक्य आहे "शहाजीच्या बरोबर निघालेल्या सहा सरदारांचीं नांवें परमानंदानें दिलीं आहेत त्यांत **शहाजीचा चुलत भाऊ त्र्यंबकराज याचें नांव आहे.**" या विधानाचा आधार तपासणें अवश्य आहे. अ. ५/६ वर त्र्यंबकराजाचा उल्लेख आहे तो असा—

भ्राता त्र्यंबकराजश्च दत्तराजश्च दर्पितः यांत त्र्यंबकराजाचे जोडीस दत्तराज आहे. त्र्यंबकराज हा शहाजीचा चुलतभाऊ म्हटला तर दत्तराज हाही शहाजीचा चुलत भाऊ म्हणावा लागेल. पण शहाजीच्या चुलत भावांत दत्तराज कोणी नाहीं. म्हणून त्र्यंबकराज हा शहाजीचा चुलतभाऊच असें निश्चयानें म्हणतां येत नाहीं.

१२/१९ पहा– दत्तत्र्यंबकराजाभ्यां भ्रातृभ्यां परिवारितः। यावरून दत्त व त्र्यंबक हे भाऊ भाऊ होते हें स्पष्टच आहे.

१२/१८ यांतील "त्र्यंबक-दत्ताह्वौ राजानौ" म्हणजे हेच. १२/७० व १२/८७ यांमध्येंहि ही जोडी आहेच. तेव्हां त्र्यंबक व दत्त हे बंधु भोसले कुळांतले कदाचित् असले तरी ते विठोजीचे पुत्र मात्र नव्हत. म्हणून वरील सर्व उल्लेखांतील त्र्यंबकराज हा शहाजीचा चुलत भाऊ (विठोजीचा पुत्र) नव्हे.

१३. शिवपत्तन कोणतें? शिवापूर कीं राजगड? भारताचे अनुवादावरून व सूचीवरूनहि याचा निश्चय होत नाहीं. शिवपत्तन हें या दोहोंचेंहि नांव होतें असें म्हणणें युक्त वाटत नाहीं. जेधे करीन्यांत (शि. च. प्र. पृ. ४२ शेवटली ओळ) शिवपत्तन वसविल्याचा उल्लेख आहे तें शिवापूर होय. शिवभारतांत जेथें जेथें शिवपत्तन हा शब्द आला असेल तेथें हेंच शिवपत्तन घेणें अवश्य वाटतें.

१४. अफझलखानाच्या भेटीच्या वेळीं शिवाजी महाराजांच्या मनांत कांहीं कपट

नव्हतें. खान सरळ वागता तर महाराजहि सरळ वागून त्याशीं तह करिते असें समर्थन कित्येक करितात. पण शिवभारत असलें समर्थन करीत नाहीं. अध्याय २१ श्लोक ९ पहा.

एवं विधाय नियमं विधाय च्छलमांतरम्
दिदृक्षमाणावन्योन्यं तदानीं तौ व्यराजताम्।

दोघांनींहि मनांत कपट योजिलें होतें असें येथें स्वच्छ म्हटलें आहे. अफझलखान शत्रु होता; त्याचा निकाल करण्याच्या हेतूनेंच शिवाजी महाराज जावळींत आले होते. २३/७. अफजलखान, त्याचें जावळींत आलेलें सैन्य आणि वाईत राहिलेलें सैन्य या सर्वांचा फडशा एकाच दिवशीं पाडण्याची योजना महाराजांनीं आखली होती व म्हणूनच त्यांनीं भेटीच्या दिवशींच वाईवर जाण्याची आज्ञा नेताजीस केली होती. २३/६७ राजनीतिदृष्ट्या यांत कांहीं अयोग्य नाहीं आणि म्हणूनच भारतकार महाराजांनींहि मनांत ( छल ) कपट योजून ठेविलें होतें असें स्पष्टपणें सांगण्यास कचरत नाहीं.

१५. भेटीच्या वेळीं शिवाजी महाराज कशाप्रकारें सज्ज झाले होते, त्यांनीं कोणतीं हत्यारें घेतलीं होतीं व ते मंडपापाशीं कसे आले यासंबंधीं भारतांतील वर्णन असें आहेः- महाराजांनीं शिरस्त्राण किंवा कवच घातलेंच नव्हतें. २१/५१.६० पहा. उष्णीषेणैव यांतील 'एव' शब्दानें डोकीस फक्त उष्णीषच होतें म्हणजेच शिरस्त्राण नव्हतें असें कवि दर्शवीत आहे. ते शिवकवचानें सुरक्षित होते म्हणून त्यांस बाह्य कवचाची आवश्यकताच नव्हती असा भारताचा आशय दिसतो. भारतांत काय आहे एवढेंच मी येथें सांगत आहें. २१/६९ मध्यें कृपाण व पट्टिश (पट्टा) अशीं दोन हत्यारें सांगितलीं आहेत. महाराजांनीं, तरवारीनें अफजलखानाचीं आंतडीं व हेर काढलीं व पट्टयानें डोकें उडवलें म्हणजे महाराज सव्यसाची होते. पण २०/६६.६३ पहा. तेथें कृपाणी हा शब्द भवानी तरवारीचाच दर्शक आहे. आफजलखानाचीं आंतडीं ओढून बाहेर काढलीं त्यास कृपाणिका म्हटलें आहे. २१/३९.४० कृपाण म्हटलें नाहीं. तेव्हां कृपाणिका म्हणजे कट्यार हें तिसरें हत्यार भारतकारानें उल्लेखिलें आहे अशी शंका येण्याचा संभव आहे असें मानावयास नको. महाराज गडावरून उतरले ते सिंहाप्रमाणें उड्या घेत उतरले, निर्भयपणें खानापुढें टाकले व त्यास ते क्रुद्ध अंतकाप्रमाणें भासले असें भारतांत वर्णिलें आहे. ते भीतभीत दबकत दबकत उतरले असलें नेभळट वर्णन भारतांत नाहीं.

१६. जावळींतील अफजलखानाच्या सैन्यावर मराठ्यांनीं जो हल्ला केला तो नेताजी पालकराच्या नेतृत्वाखालीं केला असें वर्णन बखरी इत्यादिकांतून आढळतें. तेथें नेताजी नव्हता, तो देशावर होता, असें भारतांत आहे. भारताप्रमाणें याच दिवशीं वाईवर हल्ला करण्याची कामगिरी नेताजीवर सोंपविलेली आहे म्हणून तो जावळींत असणें शक्य नाहीं.

१७. जावलीच्या रानांत कोणकोण दबा धरून बसले होते हें सांगतांना जेधेकरीन्या-मध्यें "वरकड देशमुखाचा जमाव" असे शब्द आले आहेत. (शि. च. प्र. पृ. ४४/५ पहा) वरकड देशमुख म्हणजे इतर सर्व देशमुख, या अर्थानें वरकड हा शब्द येथें जमत नाहीं असें वाटतें. कारण पुढें आणखी देशमुख सांगितले आहेतच. म्हणून 'वरकड' यांत कांहीं लेखनवाचन दोष असावा आणि येथें 'वरकड' याचे जागीं एकादें आडनांव असावें अशी शंका येते. 'वरखल' असें आडनांव आहे. जेधे देशमुखाच्या जोडीस वरखल देशमुखाचा जमाव होता असें येथें जेधे करीन्यांत उल्लेखिलेलें असावें. हा वरखल देशमुख म्हणजे शिव भा० ३२/२ मधील 'कुंडो वरखलस्तथा' यांतील कुंडाजी वरखल संभवेल. जेधेकरीना व भारत यांचा येथें मेळ आहे असें मला वाटतें. कुंडाजी वरखलाच्या जोडीला जेधेहि होते. जे सरदार भारतकारास महत्त्वाचे वाटले त्या थोड्या सरदारांचाच उल्लेख त्यानें केला आहे. सर्वांचाच कांहीं केला नाहीं. भारतकारास कुंडाजी वरखल अधिक महत्त्वाचा वाटला म्हणूनच त्याचा उल्लेख त्यानें केला. जेधे, सिलीमकर इ० चा केला नाहीं. तो जेधेकरीन्यांत केला आहे हें साहजिकच आहे.

१८. प्रतापगडच्या युद्धाची योजना शिवाजी महाराजांनीं किती पूर्णत्वानें आंखली होती हें, भेटीच्याच दिवशीं नेताजीनें वाई गांठावी अशी महाराजांनीं त्यास आज्ञा केली होती या गोष्टीवरून उत्तम निदर्शनास येतें २३/२० पहा. या आज्ञेप्रमाणें नेताजी-कडून घडलें असतें तर फाजलखान, मुसेखान वगैरे जावलींतून निसटलेले सरदार नेमके नेताजीच्या तावडींत सांपडते आणि विजय शंभर टक्के झाला असता. पण नेताजीस एक दिवस उशीर झाला यामुळें फाजलखान वगैरेंना वाईंतील सैन्य व साहित्य घेऊन पळून जातां आलें. नेताजीनें त्यांचा पाठलाग केला पण तो निष्फळ झाला. अ. २३ श्लोक २० ते २३ पहा. "यस्मिन् अहनि मम तस्य च दर्शनं भवेत् तस्मिन् एव अहनि त्वं असंशयं वैराटं अंतिके कुर्याः इति स्पष्टमेव आदिष्टः सः सैन्यपतिः यस्मिन् अहनि शिवाफजलयोः युद्धं अभूत् तस्य उत्तरे अहनि वैराटं आययौ। तेन ते मुसेखान प्रभृतयः न धृताः तेन सर्वतो दिशं विद्रुताः।"

एकंदरींत मुसेखानादिक सरदार या वेळीं निसटूं शकले याविषयीं तत्कालीन मराठ्यांस जी हळहळ वाटली असेल तीच भारताच्या या शब्दांत व्यक्त झाली आहे असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं.

१९. प्रतापराव मोरे हा चंद्ररावाचा भाऊ असें प्रस्ता. पृ. १४९ वर म्हटलें आहे. चंद्रराव म्हणजे यशवंतराव मोरे, हा दत्तक आहे. तेव्हां प्रतापराव हा त्याचा भाऊ कसा होईल? १८/१२ मध्यें त्यास चंद्रसनाभि म्हटलें आहे. १३/५५ मध्यें 'अस्य सनाभिरपि भैरवः' यांत सनाभि शब्द आला आहे, त्याचा सख्खा भाऊ असा अर्थ केला आहे, तसाच तो येथेंहि धरला असावा. पण सनाभि म्हणजे भाऊबंद, सात पिढ्यांतला भाऊबंद, एवढाच अर्थ आहे. सपिंडास्तु सनाभयः इत्यमरः, नाभि म्हणजे

मूळ पुरुष. प्रतापराव हा. मोऱ्यांच्या वंशावळींत कोठें बसतो हें पाहिलें पाहिजे. तो चंद्रावाचा सख्खा भाऊ मात्र नव्हेच.

२०. [२६/१४] पद्य पन्हाळ्याहून निसटून जाण्याचा बेत ठरवितांना शिवाजी महाराज म्हणतात :— **पंचमोऽयं तु संप्राप्तो नभाः श्यामनभाः शुभः।**

नभाः म्हणजे श्रावण हा पांचवा महिना आतां प्राप्त होत आहे असें शिवाजी महाराज म्हणतात. पण **जेधे शकावलींत** पन्हाळ्याहून महाराज निसटल्याची मिति **आषाढ वा। १** दिली आहे. या दोन उल्लेखांत विसंगति भासते. या विसंगतीचा परिहार असा कीं, कवींद्र हें भारत काशींत बसून तेथील पंडितांस ऐकवीत आहे. तेथील गणनेप्रमाणें महाराज श्रावण वद्य १ लाच निसटले. काशींतील श्रावण वद्य प्रतिपदा तीच महाराष्ट्रांतील आषाढ वा। प्रतिपदा होय. म्हणून जेधे शकावलींतील व शि. भा. तील उल्लेख बरोबरच आहेत.

२१. भारताप्रमाणें पाहतां शिवाजीमहाराजांस विशाळगडावर पोंचण्यापूर्वी जोहराच्या सैन्यानें गांठलेंच नाहीं. त्यांस गड चढण्यास जो अडथळा झाला तो त्या गडास वेढा देऊन बसलेल्या जसवंतराव, सूर्यराव इत्यादिकांच्या सैन्याचा; विजापुरी सैन्याचा नव्हे. मराठ्यांवर यावेळीं मोठा बांका प्रसंग आला होता. शिवाजी महाराज मोठ्या सैन्यासह पन्हाळ्यांत अडकून पडले होते. त्यांस मदत पोंचविण्याचे कामीं नेताजीस पूर्ण अपयश आलें होतें. त्यानंतर तो विशाळगडासच आला असावा, पण भारतांत तसा स्पष्ट उल्लेख नाहीं. विशाळगडावर महाराजांनीं मोठें सैन्य आणून ठेविलें होतें असा उल्लेख आहे. पण या गडास पालीचा जसवंतराव, शृंगारपूरचा सूर्यराव इत्यादिकांनीं वेढा दिल्यामुळें हें सैन्यहि कोंडून पडलें होतें. आणि पुणें येथें शास्ताखानाचा तळ पडलेला होता. हा प्रसंग अत्यंत आणीबाणीचा होता. राजगडावर जिजाबाई होती ती अत्यंत चिंताकुल झाल्याचें भारतांत वर्णिलें आहे तें उगीच नव्हे. **तत्तद्व्रतवतीं नक्तंदिवमंचितदेवताम्** असें तिचें वर्णन भारतांत केलें आहे. तसेंच पुत्रास सोडविण्यासाठीं स्वतः पन्हाळ्याकडे जाण्यास ती उत्सुक झाल्याचें भारतांत वर्णिलें आहे. अत्यंत साहसानें शिवाजी महाराज या संकटांतून निसटले. **अज्ञाता नैव निर्याति न चायाति पिपीलिका** [२७/१४], जेथें मुंगीलाही वाट नव्हती अशा वेढ्यांतून निसटण्याचा प्रयत्न करणें हें तर साहस होतेंच. पण रात्रीचा दिवस करून धावपळ करीत ४० मैल अंतर तोडल्यावर तशा श्रांत स्थितींत भरदिवसा केवळ सहाशें लोकांनिशीं शत्रूची फळी फोडून विशाळगडावर चढणें हें साहस अकल्पनीय होतें. पण तेंहि करून महाराज त्यांत यशस्वी झाले !

महाराज निघाले ते रात्रीच्या पहिल्या प्रहरीं. **"यामिन्याः प्रथमे यामे प्रस्थितः पृथिवीपतिः"** [२६/१६]. अगदीं जवळच्या निर्जन डोंगरी पाऊल वाटेनें ते गेले तरी अंतर

४० मैल झालें, तें ७ प्रहरांत त्यांनीं तोडलें. २७/१३. म्हणजे दुपारीं ३,४चे सुमारास ते विशाळगडास पोचले. जोहरानें मसूदास विशाळगडाकडे पाठविलें. तेव्हां तो त्यास म्हणतात

निजकार्यान्तरव्यग्रो विशाले च शिलोच्चये
स चिरं वत न स्थाता त्वमतस्त्वरितो भव ॥ २७/२२

यावरून शिवाजी विशाळगडास पोचल्याचें जोहरास कळल्यावरच त्यानें मसूदाची रवानगी केली. शिवाजी पन्हाळ्याहून निसटला त्यास उपाय नाहीं पण आतां त्यास विशाळगडास कोंडून धरावयाचें तरी, याच हेतूनें ही रवानगी झाली आणि तीप्रमाणें जसवंतरावे, सूर्यराव व मसूद इत्यादिकांनीं विशाळगडास पुन्हा वेढा दिला. २७/२६ पहा.

तें सर्वेऽपि मसूदेन ससैन्येनाभिमानिना
समेत्य भूधरमसुं भूयो रुरुधुरुद्धताः ॥

शिवाजी महाराजांनीं या सर्वांचा धुव्वा उडविल्याचें वर्णन पुढें आहे. भारतांतील ह्या सर्व वृत्तांत पाहतां जसवंतराव, सूर्यराव इत्यादिकांनीं विशाळगडास पहिला वेढा दिला असतां तो फोडून शिवाजी महाराज गडावर चढले. तेव्हां त्यांचा पाठलाग करणारांस अडविण्याची कामगिरी बाजीप्रभूनें केली असें दिसतें. वेढा फोडून महाराज वेगानें वर चढत असतील व वेढा देणारें सैन्य त्यांचा पाठलाग करूं लागलें असेल; या सैन्यास बाजीप्रभूनें प्राणपणानें अडवून धरलें असेल. भारताप्रमाणें बाजीप्रभूच्या पराक्रमाचा हाच प्रसंग संभवतो आणि स्वामिकार्यार्थ प्राणार्पण करण्याच्या बाबतींत यांत. कांहींच न्यूनता नाहीं. प्राणपणानें शत्रूस अडवून धरलें ही गोष्टच महत्त्वाची; ते शत्रु कोण होते, ही गौण गोष्ट होय.

मसूद वगैरे सरदार लवकरांत लवकर म्हणजे सूर्योदयास निघाले म्हटलें तरी ते ३ प्रहरांत विशाळगडास पोचणें शक्य वाटत नाहीं. जवळच्या डोंगरी पाऊल वाटेनें जर अंतर ४० मैल भरलें तर तें राजरस्त्यानें सहजच पाऊणशें ऐंशी मैल भरणार. तशांत कोंकणचा तो उंचसखल प्रदेश, भर पावसाळा, नदीनाले भरून गेलेले, हेंहि, ध्यानीं घेतलें पाहिजे. मसूदाच्या सैन्याची कशी दुर्दशा उडाली तें भारतांत पुढीलप्रमाणें वर्णिलें आहेः—

आजानु तुरगास्तस्य ममज्जुः पथि पंकिले
निपेतुः पत्तयश्चापि सांद्रशैवालसंकुले ॥ २७/२४

एवंच, मसूदाचें सैन्य शिवाजीस गांठूं शकलें नाहीं, हें शिवभारताचें म्हणणेंच सयुक्तिक वाटतें. शिवाजीमहाराजांस विशाळगडावरच मसूद आल्याचें समजलें. २७/२५ पहा. ' तत्र शिलोच्चये वसन् ' ' शिवराजः मसूदं आगतं श्रुत्वा इ०. अर्थात्' भारताप्रमाणें पाहतां मसूदानें महाराजांस गांठलेंच नाहीं.

२२. पन्हाळा ते विशाळगड यांमधील शिवाजीनें अनुसरलेला जवळचा डोंगरी पायरस्ता आणि मसूद गेला असेल तो राजरस्ता यांचा मोठ्या प्रमाणावर नकाशा काढून त्यांत नदीनाले, टेकड्या, खिंडी, गांवें इ० भरून सविस्तर वर्णन कोणा इतिहासाभ्यासकानें चापूर्वी केलें नसल्यास कोणीतरी अवश्य करावें, अशी सूचना करावीशी वाटते. विशाळगडास वेढा देणाऱ्या सैन्यास पिटाळून लावून महाराज राजगडास गेले. आतां शास्ताखान प्रकरण सुरू होतें.

२३. शिवाजी राजगडावर असल्यामुळें त्याच वाटेनें कोकणांत उतरण्यासाठीं मोगल सैन्य येईल असें अनुमान शिवाजी व त्याचे मंत्री यांनीं केलें होतें. प्रस्ता. पृ. १८५ व ३८/४८ हें अनुमान पूर्णांशानें खरें ठरलें नाहीं, अंशतः खरें ठरलें, असें मला वाटतें. मोगल सैन्य या खोऱ्यांत शिरून सह्याद्रीपर्यंत आलें असावें; पण या बाजूनें तें सह्याद्रि उतरण्याचा प्रयत्न न करितां परत गेलें असावें, असें पुढील श्लोकावरून दिसतें. या स्वारीवर नेमिलेला सरदार शास्ताखान, कारतलब यास म्हणतो,

प्रबलं गालिबं जित्वा संप्रति स्वबलाश्रयात्
प्रचंडपुरमादाय मह्यं दत्तमिह त्वया ॥ ३८/५४

या श्लोकाचा उलगडा आजवर नीट झालेला नाहीं असें वाटतें. या श्लोकांतील प्रचंडपुर कोणतें तें कळत नाहीं असें उपोद्घात पृ. २८ वर म्हटलें आहे. गालिब हा एक (मराठा) सरदार असल्याचें मानण्यांत आलें आहे असें, "बलाढ्य गालिबास जिंकून" या अनुवादावरून वाटतें. तत्कालीन मराठे सरदार व देशमुख यांची आतां पुष्कळशी माहिती इतिहासज्ञांस झालेली आहे. म्हणून गालीब हा जर पुणेप्रांतीं वावरणारा कोणी बलाढ्य मराठा सरदार असेल तर तो कोण कोठील हें आतां इतिहासज्ञांस सांगतां आलें पाहिजे व तसें सांगतां येत नसेल तर गालिब हें (मराठा) व्यक्तीचें नांव नसून स्थलनाम असेल अशी कल्पना करून त्या दृष्टीनें त्याकडे पाहिलें पाहिजे असें मला वाटलें. 'गालीब' हें जर एकादें मजबूत गांव असेल तर तें आणि प्रचंडपूर हीं दोन्ही एकाच स्वारींत जिंकतां येतील अशीं जवळजवळचीं स्थळें असलीं पाहिजेत आणि एकाच खोऱ्यांतलीं असलीं पाहिजेत व त्यांतही पुण्याहून जातांना आधीं गालीब व त्यानंतर प्रचंडपूर असावयास हवें. मोगल सैन्य राजगडच्या रोखानें सह्याद्रीवरून कोकणांत उतरण्यासाठीं येईल असें अनुमान कवींद्रानें शिवाजीच्या सचिवांकडून वदविलें आहे, त्यापक्षीं हीं दोन्ही स्थळें त्याच राजगडच्याच बाजूचीं असलीं पाहिजेत अशीहि कल्पना मनांत येते. म्हणून मी येथें असें सुचवूं इच्छितों कीं, **प्रचंडपूर** म्हणजे **प्रचंडगड** असा अर्थ असावा. पुर म्हणजे किल्ला असा अर्थ आहेच. आतां प्रचंडगडाच्या अनुरोधानें गालिब हेंही एक गांव मानून त्याचा शोध इतिहासज्ञांनीं करावा. मीहि येथें एक कल्पना सुचवूं इच्छितों. मला असें वाटतें कीं, **गालिब** याचे जागीं **दालिब** असा शब्द असेल. दालिब यांनीं

दकाराचा खालचा काना जरा वर सरून ओळीस मिळाला तर दालिब याचें गालिब दिसूं लागेल. लेखकांकडून दालिबचे जागीं गालिब पडणें अशक्य वाटत नाहीं. दालिब हें जेधे यांचें मोकाशाचें गांव आहे. शिवाजी महाराजांनीं कान्होजी जेधे यांस **दालिब** व **शिंदवणें** या गांवांचा मोकासा दिल्याचा उल्लेख जेधेकरीन्यांत आहे. शि. च. प्र. पृ. ४१ ओळ २०. गालीब कोठें आहे तें मला माहीत नाहीं पण तें याच खोऱ्यांतलें असणार तेव्हां मी येथें असें सुचवूं इच्छितों कीं, शिवभारतांतील प्रस्तुत श्लोकांतील गालिब ही मनुष्यव्यक्ति नसून तें कान्होजी जेधे यांचें मोकाशाचें गांव जें दालिब तें असावें आणि प्रचंडपूर म्हणजे प्रचंडगड असावा. मोगलांचें सैन्य राजगडच्या बाजूस येऊन तिकडील घाटानें कोंकणांत उतरेल असा जो शिवाजी महाराजांनीं व त्यांच्या मंत्र्यांनीं अंदाज केला होता त्याप्रमाणें मोगल सैन्य दालिब जिंकून थेट प्रचंडगडापर्यंत आलें असावें. पण तिकडील घाटांत मराठ्यांकडून प्रतिकार होईल हें हेरून त्या बाजूनें कोंकणांत उतरण्याचा प्रयत्न न करितां तें लोहगडाकडून उतरलें; हें भारतांत पुढें आलें आहेच. राजगड-प्रचंडगडाकडून कोंकणांत उतरण्याची हूल दाखवावी आणि अचानक लोहगडाकडून खालीं उतरून एकदम कल्याण-भिवंडीकडे किंवा नागोठणें चौलकडे जावें असा मोगलाचा बेत असावा. शास्ताखान म्हणतो,

> चंपावत्यथ कल्याणपुरं भीमपुरी तथा
> पणवल्ली पुनर्नागस्थानं कार्यं त्वयात्मसात् ॥ २८/५९

असें शास्ताखानानें कारतलबास सांगितलें, यावरून हा बेत उघड होतो. प्रचंडपुरकडील व लोहगडकडीलहि स्वारीचा प्रमुख कारतलबखान हाच होता. कारतलब म्हणजे काहारतलबखान ( जेधे श० ) याच्या बापाचें नांव २८/५७ मध्यें जसवंत असें सांगितलें आहे. जसवंत हें हिंदु नांव दिसतें आणि कारतलब हा तर यवन म्हणून सांगितलें आहे. जसवंत अजबड वंशांतला सांगितला असून अनुवादांत अजबड म्हणजे उझबेग सांगितलें २८/५२, हें कसें? हा जसवंत अजबड वंशांतला दिसत नाहीं. २५/२८ वर तीन उजबख म्हणजे उजबेग म्हटलें आहे तें युक्त दिसत नाहीं. जसवंत हा त्या वंशांतला दिसत नाहीं. म्हणून अजबड आहेत ते मुसलमान आहेत. इतिहासज्ञांनीं या कोड्याचा उलगडा करावा. म्हणजे उजबेग असें म्हणणें युक्त वाटत नाहीं.

## २४. उंबरखिंडीचें युद्ध—

शिवभारतानें ज्या घटनांवर विशेष प्रकाश पडला आहे त्यांत उंबरखिंडीचें युद्ध ही प्रमुख घटना आहे. म्हणून शिवभारत प्रसिद्ध झालें तेव्हां किंवा नंतर या युद्धासंबंधानें व तें ज्या स्थळीं घडलें त्या स्थलासंबंधानें तपशीलवार वर्णन विस्तृत नकाशासह प्रसिद्ध झालें असलें पाहिजे, पण तें वाचल्याचें मला स्मरत नाहीं. आतां

शिवभारत वाचावयास घेतल्यानंतरच या युद्धासंबंधीं बऱ्याच गोष्टी मला समजल्या. ज्या घाटानें मोगलसैन्य कोकणांत उतरलें त्याचें नांव कवीनें दिलें नाहीं. पण–

एकपद्या तया यान्ती नालिकायंत्रतुल्यया
अभूदतीव स्थगिता वाहिनी सा पदे पदे ॥ [३६]

यांतील नलिकायंत्राची उपमा वाचतांच मला 'आंबेनळीचा घाट' हें नांव आठवलें. जांभूळपाडा येथील माझे एक स्नेही आंबेनळीच्या घाटानें लोणावळ्यास येऊन मजकडे येत असत. त्यांच्या बोलण्यांत आंबेनळीचा घाट पुष्कळदां येई. आंबेनळी या नांवांतील नळी या शब्दावरूनच कवींद्रास येथें नलिकायंत्राची उपमा सुचली असली पाहिजे व म्हणून मोगलसैन्य ज्या घाटानें कोकणांत उतरलें तो आंबेनळीचाच घाट होय, असें माझ्या मनानें ठरविलें. भारतांत पुढें असें वर्णिलें आहे कीं, आंबेनळीच्या घाटानें कोंकणांत उतरून कांहीं अंतर गेल्यानंतर या सैन्यास उदुंबरखंड नामक गहन अरण्य लागलें. [३७] या अरण्यास उदुंबरखंड हें नांव कसें पडलें असेल ? खंड म्हणजे समुदाय. या अरण्यांत पुष्कळशीं उंबराचीं झाडें असतील म्हणून हें नांव पडलें असेल. शिवाय शेजारच्या गांवावरूनहि अरण्यास नांव देतात म्हणून याच्याजवळ 'उदुंबर' या शब्दाशीं जमेल असें कांहीं गांव असेल असें मनांत आलें. तेव्हां त्या भागांतील माहितगार सद्गृहस्थ पालीचे श्री. बापूसाहेब लिमये त्यांस कार्ड लिहून आंबेनळीचा घाट कोंकणांत जेथें उतरतो, त्याच्या आसपास उदुंबर या शब्दाशीं जमेल असें कांहीं गांव असल्यास कळवावें म्हणून विनंती केली. श्री. लिमये यांनीं कळविलें कीं आंबेनळीचा घाट कोंकणांत जेथें उतरतो तेथून कांहीं मैलांवर पेण तालुक्याचे हद्दीत उंबरें या नांवाचें गांव आहे, त्याच्याजवळ सतीचा माळ आहे व तुम्ही म्हणतां तें युद्ध तेथेंच झालें इ०. [illegible] पेण तालुक्यांतील ह्या डोंगरी भागांत रमेश हिंदरारे [illegible] आहेत त्यांचें स्मरण झालें. त्यांनीं सविस्तर माहिती कळविली व [illegible]. त्यांनीं कळविलेल्या माहितीचा सारांश असा:— आंबेनळीच्या घाटाच्या [illegible] चावणी नांवाचा गांव आहे त्याचे दक्षिणेस तुरुनाई हा गांव आहे. या गांवाजवळून [illegible] नदी वाहते, हिलाच पुढें नागोठण्याची नदी म्हणतात. चावणी [illegible] चावणीच्या पश्चिमेस ॥५ मैलांवर उंबरें आणि तेथून ॥५ मैलांवर [illegible] आहे. येथें मोठा तलाव आहे. क्षेत्र ५ एकर आहे. उंबरें [illegible] सतीचा माळ आहे. त्याच्या जवळ एक तलाव [illegible] म्हणतात. नेरे–नापोली येथेंही एक ३१४ [illegible] उन्हाळ्यांतही पाणी असतें. उंबऱ्यापासून [illegible] उताराचा व [illegible] असेल. सोपवली–पाली मोठा [illegible] उतरल्यावर [illegible]

असो, या उंबरखिंडींतूनच जावें लागतें. यावरून हें ध्यानीं येईल कीं मोगल सैन्य लोहगडाकडे वळलें असें कळतांच तें सैन्य तिकडून कोणत्याही घाटानें खालीं उतरलें तरी त्यास पुढें उंबरखिंडींत यावेंच लागणार; हें जाणून महाराजांनीं आपलें सैन्य त्वरेनें तेथें आणून उंबरखिंडींतील* रस्त्याच्या दोहो अंगाच्या झाडींत लपवून ठेविलें आणि मोगलाचें सर्व सैन्य या खिंडीच्या रस्त्यांत शिरल्यानंतरच त्यावर चोहोंकडून हल्ला करून त्याचा निकाल लाविला. या एकंदर योजनेंत शिवाजी महाराजांचें अद्वितीय सेनानायकत्व उत्तम प्रकारें प्रतीत होतें.

काशींतील पंडितांनीं कवींद्रास दोन मार्मिक प्रश्न विचारले आहेत. २८/७६ व २८/७३ पहा. पहिला प्रश्न असा कीं, मोगल सैन्य अतिसंकटानें सह्याद्रीच्या खिंडींतून उतरत असतांच शिवाजीनें त्यांवर हल्ला कां केला नाहीं? त्यांस खिंडींतून सुखेनैव खालीं कां उतरूं दिलें? त्यांचा दुसरा प्रश्न असा कीं, मोगल सैन्य सह्याद्रींतून सुखरूप खालीं उतरल्यानंतर त्यानें लगेच कल्याण वगैरे प्रांत कसे व्यापले नाहींत?

काशींतील पंडितांना कोंकणच्या ह्या भूभागाची कल्पना नसल्यामुळेंच त्यांस या शंका उद्भवल्या आहेत. कवींद्र परमानंदानें समर्पक उत्तर देऊन त्यांचें समाधान केलें आहे. आतां स्थलविषयक दोन गोष्टींचाच उल्लेख मला करावयाचा आहे.

२५. नकाशांत (शि. भा. पृ. २४९ चें मागील पान) तुंग किल्ल्याजवळ तुंगारण्य दाखविलें आहे, पण २८/६२ मध्यें तुंगारण्यपति मित्रसेन म्हणून सांगितला आहे. या नांवावरून तो महाराष्ट्रीय दिसत नाहीं. शिवाय तो कारतलबखानाचा मोठा साह्यकर्ता आहे. शिवाय २९/३३ पहा. "तुंगारण्यादपि घनं सह्यारण्यमिदं तव" यांतील तुलनेवरून तुंगारण्य हें सह्याद्रीच्या लगतचें दिसत नाहीं. शास्ताखानाबरोबर उत्तरेंतून आलेल्या सरदारांपैकींच हा तुंगारण्यपति मित्रसेन असावा व तुंगारण्यही तिकडलेंच कोठलें तरी असावें. तुंग-किल्ल्याजवळचें नसावें.

२६. नकाशांत (पृ. २४८ चे पुढील पान) भोर संस्थानांतील पालीस पल्लीवन म्हटलें आहे. पण भारतांत आलेलें पल्लीवन रत्नागिरी जिल्ह्यांतील आहे. या पल्लीवना-जवळच्याच चिरदुर्ग डोंगरावर मंडणगड बांधल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. ३१/१६ व ३१/३६ पहा. २९/६२ मधील पल्लीवनहि हेंच. म्हणून नकाशांत मंडणगडाजवळ पल्लीवन दाखविलें पाहिजे.

---

* उंबरखिंड हें सह्याद्रींतून उतरण्याच्या घाटाचें नांव नव्हे. सह्याद्रींतून कोंकणांत उतरल्यावर एक खोरें ओलांडल्यानंतर पुढें जें उंचसखल विस्तीर्ण निबिड अरण्य लागतें त्याचें नांव उंबरखिंड. अर्थात् उंबरखिंडीचें युद्ध सह्याद्रींत झालें नसून कोंकणांत झालेलें आहे.

# शिवभारत—पाठभेद

ह्या सुचविलेल्या पाठभेदांतील बरेचसे पाठ मंडळसंग्रहांत असलेल्या हस्तलिखित शिवभारताच्या पोथींत आढळले. ही पोथी शिवभारत ग्रंथ छापल्यानंतर मंडळाकडे आली.—**सं.**

| अध्याय | श्लोक | छापील पुस्तकांतील पाठ | फर्के यांनीं सुचविलेला पाठ |
|---|---|---|---|
| १ | १ | स्विद्यत् | सिद्यत् |
| ३ | ३ | वक्कश्य | कक्कश्य |
| ३ | ६ | सहस्रांशु | सहस्रांशु |
| " | १९ | निस्त्रिंश | निस्त्रिंश |
| " | २६ | अनुजं | सानुजं |
| " | ४१ | समीहितम् | समाहितम् |
| ४ | ५ | तद्देव ( शु० ) | तद्देव |
| ४ | ३९ | सज्जानां | सज्यानां |
| ५ | ३१ | उत्थाप्य स्थापिताः | उत्खाय यापिताः |
| ५ | ४४ | यथागतमुखे | तथागतमुखे |
| ६ | २४ | दीप्त | दीप्त |
| " | ५२ | दशमेह्नि | दशाहान्ते |
| " | ७१ | कृतावर्त्मां | कृतावर्तां |
| " | ७५ | उड्डान् | उड्डान् |
| " | ८४ | किम्मीर | किर्मीर |
| " | ८५ | गुरुत्मत् | गरुत्मत् |
| " | ९४ | रंभोजस्यमलोचनम् | रंभोजास्यमलोचनम् |
| ८ | २८ | दुर्मंत्रिते | दुर्मांत्रितं किंवा, दुर्मंत्रिणो |
| ८ | ३५ | समुह्य | समूह्य |
| " | ६१ | मंत्रि | मैत्री |
| ९ | २६ | स्वमानसम् | स्वमासनम् |
| " | ३८ | महीभुजम् ( शु० ) | महाभुजम् |
| " | ५२ | परिशीलित | परिशीलिते |
| १० | १३ | कुशलमस्ति | कुशलमस्तु |
| | २० | एवमाविर्भवत् | एवमंतर्हिते |
| | २९ | पुण्याहं | पुण्याह्वं |
| | ३० | नावेदयदमुं | नवोद्यममुं |
| | ३५ | धनुर्वेदचिकित्सायां | धनुर्वेदे चिकित्सायां |
| १० | ४१ | वसंततौ ( शु० ) | हि वारुन्त |
| ११ | ३० | तस्य यो स | तदीयः स |
| | ३४ | विपेवत | निपेवेत |

## ९ शिवभारत पाठभेद

| अध्याय | श्लोक | छापील पुस्तकांतील पाठ | फडके यांनीं सुचविलेला पाठ |
|---|---|---|---|
| १२ | ३ | वंर्णाभः | वंत्रांभः |
| " | ७ | सिद्धमंत्राह्लो | सिद्धमंवाह्लो |
| १२ | १९ | तलजित् | वलजित् |
| " | २८ | पाटलं कुलोत्तंसं | पाटलकुलोत्तंसं |
| " | ३४ | शितिरोपमम् | शिरारोपमम् |
| " | ४२ | भिन्नभल्लस्य | भिन्नमल्लः स |
| " | ४४ | बालराजस्य | वाजराजस्य |
| " | ५४ | हृतसंबद्ध<br>दृढसंबद्ध ( शु० ) | द्रुतसंबद्ध |
| " | ६१ | परिवृत्तं | परिवृतं |
| " | ६३ | शाहराजोभ्यभिप्रेक्ष्य | शाहराजोव्यभिप्रेक्ष्य |
| " | ६४ | प्रतिदृध्या न<br>प्रातिदृध्यान ( शु० ) | प्रतिध्यानेन |
| " | ७३ | वटा इव | नटा इव |
| " | ८६ | चंडदीधितिभिर्वीर | चंडदीधितिभिट्टीर |
| " | ८८ | द्वीते | ह्लीते |
| " | ५३ | श्रृंगारस्संगरांगानां | शृंगाटस्संगरांगानां |
| १३ | ११५ | पत्यश्च | पत्यश्च |
| " | ११९ | द्वितयी | द्वितये |
| " | २७ | उंपाहित | उपाहित |
| १४ | २९ | जवना | जवनान् |
| " | ४४ | शिवतमादिष्टाः | शिवनृपादिष्टाः |
| " | ५१ | स्मयोद्धुरम् ( शु० ) | स्मयाभृतम् |
| " | ७३ | गैरिकाद्री | गैरिकाक्ता |
| " | ८५ | ताडितस्त भुजे | ताडितस्त भुजे सव्ये |
| | १९ | परिभूयते | परिभूतये |
| १५ | २४ | गुणाग्रणीः | गणाग्रणीः |
| " | २६ | मंगलस्नानं | मंगलस्नातं |
| " | २९ | तं मंतुतंतं | तं मंतुं न तु |
| " | ४२ | सौहित्यं | सुत्याहं |
| " | " | नानुयानं | नानुयातं |
| " | १४ | बिभेति च | बिभेति न |
| १६ | ३७ | चथा | तथा |
| | ४७ | उपहस्यते | उपहन्यते |
| १७ | १ | समयोचितम् | समयो॑ |

| अध्याय | श्लोक | छापील पुस्तकांतील पाठ | फके यांनीं सुचविलेला पाठ |
|---|---|---|---|
| १७ | ३९ | समर्थंबलदर्पितम् | समर्थं बलदर्पितम् |
| | ६३ | यानान्यप्रहृष्टानि | यानान्यप्रकृष्टानि |
| १८ | ५१ | चंडराजस्य | चंद्रराजस्य |
| १९ | १० | प्रतना | प्रतनी |
| ,, | १७ | समुह्य | समूह्य |
| ,, | ,, | नाभास्वती | नाभस्वती |
| ,, | २५ | प्रत्याख्यातास्तु | प्रत्याख्याता तु किंवा प्रत्याख्याताऽस्तु |
| ,, | ,, | यत्र | यस्य |
| ,, | ३३ | श्लिशारोहावरोहया | क्लिशारोहावरोहया |
| ,, | ३४ | विषमावटीम् | विषमाटवीम् |
| २० | ४ | पूर्णेंदुवंद्यवदनां | पूर्णेंदुवद्यवदनां |
| ,, | ३२ | करटिनः | करभकाः |
| ,, | ६५ | यशसा सुधामधुकथा | यशसां कथा मधुसुधः |
| २१ | ३९ | तं नियांतयितुं | तन्नियांतयितुं |
| २२ | ५७ | परश्वथैः | परश्वधैः |
| ,, | ६५ | प्रसाधतांगी | प्रसाधितांगी |
| २३ | १७ | तस्मै | तं वै |
| ,, | २५ | परिसदादमी | परिसरादमी |
| ,, | ५३ | श्रालयं | श्रयालयं |
| ,, | ६५ | भूमानमागतैः | भूमावनागतैः |
| ,, | ,, | नभोंतकारितं | नभोंधकारितं |
| २४ | २२ | नरेंद्रेण | नरेंद्रेण |
| ,, | ४० | रिजराजहः | रिपुराजहा |
| ,, | ४१ | संव्युह्य | संव्यूह्य |
| ,, | ५० | प्रतियास्यति | प्रतियास्यतु |
| ,, | ५४ | क्रचकानां | क्रकचानां |
| २५ | ८ | कामलापुर | कमलापुर |
| ,, | १४ | मागतम् | मागमत् |
| २६ | ९ | रोषावेष | रोषावेश |
| | ४१ | जंभा एवाशु | जंभायेवाशु |
| ,, | ४८ | भवने | भुवने |
| ,, | ५२ | जननीली | जलनीली |
| ,, | ७४ | नीलशैवल | नीलशैवल |
| २७ | ४२ | अनपेक्षितः | अनवेक्षितः |

| अध्याय | श्लोक | छापील पुस्तकांतील पाठ | फर्के यानी सुचविलेला पाठ |
|---|---|---|---|
| २७ | ४७ | अंचितदैवताम् | अर्चितदैवताम् |
| २८ | ५२ | मिथं ( शु० ) | निथ |
| २८ | ५३ | युद्धेनेव | युद्धेनेव |
| ,, | ७० | निवसन् | निविशन् |
| २९ | ३७ | प्रपन्नपालनमरो | प्रपन्नपालनपरो |
| ,, | ६१ | यान्यहं | याम्यहं |
| ३० | १० | गता | गताम् |
| ३१ | १७ | शौल्विकस्तथा | शौल्विकास्तथा |
| ,, | ३२ | विपालयिपुरात्मना | विपालयिपुरात्मनः |

---

## १० चीन देशांतील हजार बुद्धांचीं लेणीं व त्यांतील रंगित काम

श्री. य. रा. गुप्ते, बी. ए., एम्. आर. ए. एस्.

चीन देशांत कन्सूत जंगलाच्या एका टोंकास ग्रॅव्हेल जातीच्या खडकांत ४२६ लेणीं कोरलेलीं आहेत. सर्वांचा आकार सारखाच नाहीं. सोईप्रमाणें आकार बदलत आहे. इ. स. च्या चवथ्या शतकाच्या मध्यापासून तहत १० व्या अकराव्या शतकापर्यंत हीं खोदलेलीं असून बुद्ध भिक्षूंचें वास्तव्य यांत असे. जगांतील सर्व ठिकाणचे भिक्षूंची यांत गर्दी होई. अंदाजें बाराव्या शतकांत अंदाधुंदी माजली तेव्हां बुद्ध भिक्षूंनीं येथून पलायन केलें. तुनहुअंग चीन हिंदुस्थान व युरोप यांमधील मोठ्या रस्त्याच्या मार्गावर होतें. या मार्गानें रेशमाचा जोरानें व्यापार चाले. आपणांस हें ठाऊक आहे कीं बुद्धांचीं लेणीं मोटमोठ्या रस्त्यांच्या जवळ पण कांहीं मैल आंत खोदलेलीं असत. कां कीं भिक्षूंस तीं येण्याजाण्यास सोईचीं पडावीं व त्यांस एकाग्रताहि लाभावी. कार्लें, जुन्नर, नासिक, कऱ्हाड येथील लेण्यांवरून हें स्पष्ट होईल. तुनहुअंगहून प्रस्तुत लेणीं २५ मैल आहेत. रस्ता फार अडचणीचा आहे.

हीं लेणीं बाराव्या शतकानंतर इ. स. १८९२ त पुन्हा निदर्शनास आलीं. जर्मन सुप्रसिद्ध विद्वान सर ऑरेल स्टाइन (ज्यांच्या डेप्युटेशनमध्यें आमची नेमणूक असि. सर्व्हेअर, हिंदु व बौद्ध इमारती म्हणून झाली) त्यांनीं प्रथम या लेण्यांत संशोधनाचें करून काम केलें. हें या शतकाच्या सुरवातीस केलें. २०,००० पुस्तकें येथील वाचनालयांत दडून राहिलीं होतीं.

या लेण्यांवर कोट्यावधि रुपये धनाढ्य व्यापाऱ्यांनीं खर्चून तीं खोदविलीं होतीं. बुद्धाच्या प्रतिमा असलेलें सर्वांत उंच लेणें १०० फुटांवर आहे. भिंतीवरील पेंटिंग (चित्रित रंगीत काम) अद्याप सुस्थितींत आहे. कांहींच्या मतें अजंठ्याच्या लेण्यांतील रंगीत कामाहून तें अधिक सरस आहे.

चिनांतील या वरील लेण्यांस हजार बुद्धांचीं लेणीं म्हणतात. हें सांगावयास नको कीं "सहस्र" हा आंकडा नक्की नसून स्थूल रीतीनें दिलेला आहे.

युद्धाच्या वेळीं या कलेच्या मूल्यवान ठेव्याकडे लक्ष देण्यास अवसर नव्हता. तथापि या कालांत त्यांस म्हणण्यासारखा धोका पोंचला नाहीं. आतां चिनी सरकारनें त्यांच्या देखरेखीसाठीं वीस चिनी अम्मलदारांची नेमणूक केली आहे.

---

## ११ फडके बापूजी पंताच्या तोतयाचें पूर्ववृत्त

(प्रो. दि. के. देशपांडे)

श्री[1]

सेवेसी विज्ञापना *बापुजीपंताचा तोतया सुवर्णदुर्गावर होता त्यास आणून चवकशी केली त्यास वर्ण भिकाजी विटल गणेश विटल याचे भाऊ याप्रो वर्षा पनासाचा आहे जातीचा गुजराथी ब्राह्मण भट मेवाडा लहान दोन वर्षाचा तेव्हांपासून आईबाप मृत्य पावले अमदाबादेंत कृष्णभट उदीच ब्राह्मण याचे घरीं वाढला वृतबंध तेथेंच जाहाला उपरातीक बारा वर्षापासून देशाटण करीत भीक मागत फिरतो पुण्यांत नागेश्वरीच्या देवलात चारपांच वर्षे नेहमी राहिला अलिकडेही येतजात असतो त्याणे जानवी टाकून डोकी वाढविली आणि कोंकणात भीक मागावयास चइत्रमासी सेडचे मुकामी आला तेथे बालाजीपंत काणे याणे बलेच त्याचे गली पडोन तूं बापुजीपंत फडका ऐसे म्हणो लागले तो नाहीं म्हणत असता त्यास हरणइंस नेऊन शेंडी राखोन जानवी घालु(न) जसा खरा तो फार हा प्रकार केला राजश्री हरिपंततात्याचे आश्रीत भार्गवभट कोपरकर जागली तपस्वी होऊन त्याणी व मोरभट मराठे पडुनकर याणी त्यास घरच्या गोष्टी खुणाखाणा जुन्या सागोन माहीतगिरी केली जेव्हां मारावयाची उभा केला तेव्हां त्याणे कचे वर्तमान सांगितले त्यांचा तपसील फार आहे मोरभटाने पारपत्य करावे तर चवकसी करू लागलो तेव्हा पलोन गेले कोपरकर फेरेन ठेविले गुजराथी याचा अपराध पाहिला तर थोडा घरकडाचा फार आहे दहागर आहेर येथील

---

१ भेणवली दप्तर रुमाल ४८ फाईल २; पत्र १३४ ऐ. ले. सं. ६ पृ. २७२९ ले. १९४७ मध्यें ह्या तोतयासंबंधी 'तो फायनू, त्यास हत्तीच्या पायास बांधोन मारिला' असा मजकूर आला आहे.–सं०

ब्राह्मण त्यास पंगतीस घेऊन भोजन घेतले सर्वांनी घरोबाचे दिल्ही उभयता भट नेहमीच भोजन पंगतीस करीत होते गुजराथ्याचे नाव निमण भट म्हणून आरणाजवळ ठेविला आहे कळावे मागाहून पाठवून देतो हे विज्ञापना

( पहिले पान दुसऱ्या मजकुराचे पाठीमागचे पान, नाना फडनवीसांचे हे विज्ञापना नंतर लिहिलेली हकिकत )

“ बापुजीपंताच्या तोतया आमचे हातीं देत नव्हते त्याचे परधान मोहोरा पाठवले होते गजनीच्या नदी, हल्ली जिनगारी नकोये मानिले ओढली आगऱ्या दूत मागताचा लिया द्रोण या श्री साहित्याचा नर्मद यांना नरसील पत्री लिहिता येत नाहीं समक्षच विनंती करीत या श्री मोरोबाचे रंग हरिपंताच्या पुण्या याजकरितां क्षमा केली नाहींतर पारपत्य केले असते ध्यान धरावे[2] उभयता येऊन पदर पसरून अन्याय मागोन घेतले नाहींतर येथील येतत्याच न सांगतो स्वामींनी उपेक्षा करू नये लष्कर बंदोबस्त करावा माझे नाव घाटेर आहीगण्यात शकलपूर्वक आणु नये हे विज्ञापना......[3] ”

---

## १२ उदेपूरच्या व्यास घराण्याकडील कांहीं पत्रें

### ( श्री. अक्षयकीर्ति व्यास, एम्. ए. व श्री. ग. ह. खरे. )

[ इ. १९५१ च्या डिसेंबरांत मी ऐतिहासिक परिषदेच्या निमित्तानें जयपुरास गेलों असतां तेथें माझे मित्र श्री. अक्षयकीर्ति व्यास सुपरिंटेंडंट, आर्किऑलॉजी अँड म्यूझियम्स, उदयपूर सर्कल, उदयपूर यांनीं मला कित्येक मराठी, राजस्थानी–हिंदी व संस्कृत पत्रें दाखविलीं आणि आवश्यक तीं नकलून घेण्यास परवानगी दिली. मी व माझे मित्र डॉ. मो. ग. दीक्षित, श्री. वि. सी. चितळे व श्री. शं. ना. जोशी अशा चौघांनीं तीं नकललीं. तींच येथें प्रसिद्ध करीत आहे. या पत्रांचें पूर्ववृत्त श्री. व्यास यांनीं लिहून धाडलें तसेंच पुढें दिलें आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, त्यांचे पूर्वज उदेपूरच्या दरबारांत पंडित असून संस्कृत पत्रें लिहिण्याचें काम करीत. तसें असेल तर पुण्याच्या पारसनीस घराण्यांत पेशव्यांकडे आलेलीं फार्सी पत्रें राहिलीं तद्वत् हींहि पत्रें व्यासांच्या घराण्यांत राहिलीं असतील. पण मग मराठी–हिंदी पत्रें त्यांजकडे कां यावीं ? मला वाटतें या घराण्याकडे सर्वच मराठ्यांकडून आलेला पत्रव्यवहार पहाण्याचें काम असेल. यामुळें पेशवे, छत्रपति व त्यांचे सरदार यांचीं संस्कृत, मराठी व राजस्थानी–

---

२ सुवर्णदुर्गचे मामलेदार.

३ मेणवली दप्तर; रुमाल नं. ४८, फाईल नं. २; पत्रक्रमांक १३६.

हिंदी भाषांतील पत्रें या घराण्याकडे आलीं असावीं. या अकरा पत्रांपैकीं क्र. ३, ५, ११ हीं राजस्तानी-हिंदी, क्र. १० हें मराठी व बाकीचीं ७ संस्कृत आहेत. हीं पत्रें घाईंतच नकलावीं लागल्यानें मराठी पत्रांप्रमाणें अक्षरांच्या विविधतेविषयीं पाहिजे तितका विचार करून तशा नोंदी करणें शक्य झालें नाहीं. जेथें सहज डोळ्यांत भरणारा निराळेपणा आढळला तेथें तो नमूद केला आहे. संस्कृत पत्रव्यवहार आजवर फार थोडा उपलब्ध झाला असल्यानें त्यांच्या लेखनपद्धतीचीं वैशिष्ट्यें सध्या नीट अवगत नाहींत. म्हणून येथें त्याविषयीं कांहीं न लिहितां यांत निर्देशिलेल्या व्यक्ति व घटना इतरत्र कोठें, कशा आल्या आहेत हें दाखवितों. त्यावरून पत्रांच्या असलनकलबनावटपणाविषयीं ज्याच्या त्यानें कल्पना बांधाव्या. येथें पत्रपाठ शुद्ध करण्याचा यत्न केलेला नाहीं. ]

महाराष्ट्रवीर छत्रपति शिवाजीने अपने वंशका निकास उदयपूरके सीसोदिया राजवंशसे मानकर मेवाडके साथ छूटा हुआ संबंध पुनः स्थापित कर लिया था। उन्होंने भारतमें हिन्दू साम्राज्यकी स्थापनाका दृढ संकल्प कर शक्तिशाली मुगल सम्राट् औरंगजेबसे लोहा लिया जिसमें उन्होने मेवाडके महाराणा श्रीप्रतापसिंहका-ही मार्ग अपनाकर युद्धनीति भी वही रखी। शिवाजीका सत्यसंकल्प सिद्ध नहीं हुआ, किन्तु कालान्तरमें उनके पेशवा-मंत्रियोंने भारतवर्षमें मुगल सत्ताकी जड खोखली कर दी। दुर्भाग्यसे महाराज शिवाजी और मेवाडके महाराणा राजसिंहके बीच होनेवाले पत्र-व्यवहारका पता नहीं लगता, किन्तु शिवाजीके वंशधरों एवं पेशवाओंके पत्रादि सैंकडोंकी संख्यामें मिलते हैं जिनसे मेवाड और मरहट्टा संबंध-पर पूरा प्रकाश पडता है।

यह स्पष्ट है कि महाराणा द्वितीय अमरसिंह ( वि. सं. १७५५-६७ = ई. स. १६९८ - १७१० ) और द्वितीय संग्रामसिंहके समय ( वि. स. १७६७-९० = ई. स. १७१०-३४ ) मुगल दरबारमें महाराष्ट्र वीरोंसे संधिकी बातचीत उदयपुरके महाराणा-द्वारा भी चलाई गई थी। पेशवा वीर उदयपुरके महाराणाओंके कुलगौरवको स्मरण कर उच्च भावनाएं रखते रहे।

दक्षिण भारत और उत्तर भारतकी भाषासंबंधी विभिन्नताके कारण पत्रों-का आदान-प्रदान दोनो तरफसे संस्कृत भाषामें होता था। अठारहवी शताब्दीमें उदयपुरके दरबारमें संस्कृत भाषाभाषी कई विद्वान् थे; किन्तु व्यक्तिगत पत्र-व्यवहार-में तो केवल कुशल और विश्वसनीय व्यक्तिही प्रयुक्त किया जा सकता है। अतएव महाराणा संग्रामसिंह द्वितीयने यह कार्य अपने परंपरागत विश्वसनीय विद्वान् और प्रतिष्ठित व्यक्ति एवं मेवाडके आदिनिवासी भट्ट मेवाडा ( भट्ट मेदपाटीय ) ब्राह्मण गोवर्द्धनके पुत्र रूपजित्‌को सौंपा।

रूपजित्‌का छोटा पुत्र सोमेश्वर और पौत्र पुरुषोत्तम हुआ, जिसको महाराणा भीमसिंहने वि. सं. १८३९ ज्येष्ठ कृष्ण ७ के परवानेद्वारा 'संस्कृतिपण्डित' की

उपाधि प्रदान की। रूपजित्के देहावसानके पश्चात् उसका ज्येष्ठ पुत्र रामकृष्ण उपरोक्त कार्य विक्रम संवत्की उन्नीसवी शताब्दीके प्रारंभतक करता रहा। तत्पश्चात् उसका वंशधर भाई सोमेश्वरभी करने लगा। इस वंशमें पुरुषोत्तमके पश्चात् क्रमशः व्यास रमाराम, व्यास शिवराम और व्यास जगन्नाथ हुए। जगन्नाथका ज्येष्ठ पुत्र व्यास विष्णुरामशास्त्री हुआ और उसका ज्येष्ठ पुत्र व्यास अक्षयकीर्ति एम. ए. इस समय विद्यमान है, जो उदयपूरपुरातत्त्व–विभाग और म्यूजियमका अध्यक्ष है। अपने विषयमें सुरुचि होनेके कारण उसीके सौजन्यसे मेवाड और मरहट्टा संबंधपर प्रकाश डालनेका यह साधन उपलब्ध हुआ है। कालान्तरमें इस परिवारको उदयपुर दरबारसे 'राजकीय कथाव्यास' का पद प्रदान किया जाकर उच्च सम्मान दिया गया, जिससे इनका उपनाम व्यास हुआ। महाराणाओं द्वारा होनेवाले संस्कृत पत्र–व्यवहारका कार्य अब भी यही करते हैं। इस समस्त प्राचीन बहुमूल्य पत्रव्यवहारको अबतक सुरक्षित रखनेका श्रेय व्यास विष्णुरामशास्त्रीको है जिसने जीवनपर्यंन्त अपने विद्यानुराग और कठोर अध्यवसायके द्वारा इन प्राचीन पत्रोंका अध्ययन करते रहकर इनको प्राणोंकी तरह मूल्यवान समझा और रक्षा की।

इनकी रचनाएं :—

१ श्रीवैद्यनाथ शिवालय, सीसारमा गांव, उदयपुर की प्रशस्ति, जिसका अंतिम भाग इस प्रकार है :— पंचद्वीपमुनींदुसंमितशरच्छुक्लासिताऽद्रींद्रजादास्त्रे सूर्यसुतान्विते द्विजवरो गोवर्द्धनस्यात्मजः। प्रत्यर्थिक्षितिभृत्पराजयकरः श्रीमंडित – ⏑ – – – पामनरेश्वरस्य वचनात् श्रीरूपभट्टोलिखत्॥

संवत् १७७५ वर्षे ज्येष्ठवदि ३ शनौ लिपिकृतं भट्टगोवर्द्धनसुतेन रूपजिता (वीरविनोद, भाग ३, पृष्ठ ११७२)

२ उदयपूरके हरवेनजीके खुरेपर शिवालयकी प्रशस्ति, वि. सं. १७९० वैशाख शुद्ध १३

व्योमांकमुनिभूसंख्ये वर्षे मासि च माधवे।
दले सिते त्रयोदश्यां तिथौ च भृगुवासरे॥ २६

... ... ... ... ... ...

श्रीरूपभट्टजनुषा कविराड्वंदितांघ्रिणा।
रामकृष्णेन रचिता प्रशस्तिरियमुत्तमा॥ २९ (वीरविनोद भाग ३,पृ.१५१९)

३. मानजी धायभाईका कुण्ड( गोवर्द्धनविलास )की वि. सं. १७९९ की प्रशस्ति )

श्रीरूपभट्टद्विजराजजेन श्रीरामकृष्णेन बुधेन बुद्ध्या।
इलाविलासाहितचेतसेयं मानप्रशस्तिर्निरमायि रम्या॥ २६
सुरूपरूपद्विजराजजन्मा बुधो भवत्येव न तत्र चित्रं।
इलाविलासोद्धुराचित्तवृत्तिर्नक्षत्रभूः क्षत्रकुलप्रथोपि॥ २७

संवत् १७११ वर्षे चैत्रमासे शुक्लपक्षे १ दिने गुरुवासरे महाराजाधिराजमहाराणा-श्रीजगत्सिंहजीविजयराज्ये मेदपाटज्ञातीय भट रूपजी तत्पुत्र भट रामकृष्ण या प्रशस्ति बणाई छे ( वीरविनोद, भाग ३, पृ. १५२१.)

४. राजसिंहराज्याभिषेककाव्य ( अप्रकाशित ) । इसकी रचना रूपाजित्के छोटे पुत्र सोमेश्वरने की थी। ( ओझा, राजपुतानेका इतिहास, भाग २, पृ. ९५४, टिप्पणी २ )

५. देवारके दरवाजेके सामनेवाले राजराजेश्वरके मन्दिरकी वि. सं. १८१९ वैशाख शुक्ला ८ के अप्रकाशित शिलालेखका रचयिताभी सोमेश्वर था ( ओझा, राजपुतानेका इतिहास भाग २, पृ. ९७३ )

---

माघ असित १३ } १ ॥ श्री सांबो जयति ॥ { श. १६५७ माघ वद्य १३ / इ. १७३६ जानेवारी २९

श्रीमद्गिरिजारमणचरणाराधनावाप्तसकलगुणगणेषु मित्रजनहृत्कमलमित्रेषु श्रीदीवानजीकानामेधमानरूपांकितेषु **श्रीविहारिदासजित्सु** [ मो. जा.* ] स्नेहांकित-**बाजीरावबल्लाल**पंडितप्रधानवर्यकृताशीराशयः शमत्रत्यं **माघासित १३** पर्यंत वरीवर्ति तत्रत्यमपि कुशलमभिलषामहे विशेषस्तु युष्मत्प्रेषितपत्रमागतं महानानंदः समजनि अत्रत्यसकलमपि वृत्तं पितृव्य**सकतावतजयसिंहसूरतसिंहयो**र्वचनरचनाभिः स्फुटं भविता **सदाशिवपंडित**स्तत्र वर्तते पट्टाकार्यविषये वैलव्यं मास्तु **लक्ष्मीरामे**णेदानीं परिश्रमेण सेवा कृता भवति श्रीदीवानजीकान्प्रत्येतद्विषये विज्ञापयित्वा यथा श्रीदीवानजी-कानामेतदउपरि वर्धिष्णु कृपा स्यात्तथा कर्तव्यं भवद्भिः सर्वदा स्वकुशलपत्रामृतेन स्नेहप्रततिर्वर्द्धनीया अभिज्ञेषु किं बहुलेखनेनेत्यलं ॥

## सारांश

बाजीराव बल्लाळ प्रधान -> बिहारीदास दिवाणजी

माघ वद्य १३ पर्यंत खुशाल आहों. येथील सर्व वृत्तांत पितृव्य सकतावत जयसिंह व सूरतसिंह यांच्या सांगण्यावरून स्पष्ट होईल. सदाशिव पंडित तेथें आहे. पट्या-बाबत विलंब होऊं नये. लक्ष्मीरामानें सध्या कष्टपूर्वक चाकरी केली. तरी त्यावर आपली वाढती कृपा होईल असें करावें.

[ हें पत्र पंचोली बिहारीदासाला उद्देशून आहे. बिहारीदास इ. १७३६ मध्यें मेल्याचें समजतात असें के. ओझा लिहितात ( राजपुतानेका इतिहास, २ रा खंड, पृ. १३०८ ). पण मला त्याविषयीं संशय आहे. पेद ९।१२ या पत्राची १८।५।१७३५ ही तारीख निश्चित आहे. या पत्रांत 'बिहारीदास यांस नूतन सेवा प्राप्त जाली यामुळे स्वामीस किफायत करून दाखविताती' असें विधान आहे. तो १७३६ मध्यें मेल्याचें

गृहीत धरल्यास तो थोडेच दिवस दिवाण होता असें मानावें लागेल. पण कै. ओझा यांनीं आपल्या उपर्युक्त पुस्तकांत बहुधा वीरविनोदाच्या आधारानें तो, मुघल सम्राट फरुखसियर इ. १७१३ मध्यें गादीवर आला तेव्हां मेवाडचा वकील म्हणून बादशाही दरबारांत गेला आणि तेथें मेवाडतर्फे उत्तम सेवा केल्यामुळें इ. १७१७ पूर्वीं मेवाडचा दिवाण बनला, असें नमूद केलें आहे (पृ. १३०७). तेव्हां येथें नूतन सेवा या शब्दांचा अर्थ पुनरपि दिवाणगिरी असा मर्यादित करावा लागेल. पेद ९।१२ मध्यें पट्टाप्रकरण निर्दिष्ट आहे. यांत सक्तावत जयसिंह व सूरतसिंह अशा दोन व्यक्ति उल्लेखिल्या असून त्यांस पितृव्य म्हणून संबोधिलें आहे. तेव्हां हे महाराणा जगत्सिंहाशीं चुलत्याचें नातें धारण करणारे असावेत. यांपैकीं सूरतसिंहाचा निर्देश वीरविनोद खंड २, पृ. १२२७ वर आला आहे. जयसिंह हा त्याचा जवळचा भाऊबंद असण्याचा संभव आहे. येथील लक्ष्मीराम आणि चिमाजीच्या पत्रांत ( क्र. २ ) आलेला मिश्र लछीराम बहुधा एक असावेत. ]

---

२

॥ श्री शिवो जयति ॥

{ श. १६५८ ज्येष्ठ शुद्ध ३ सोम,
{ इ. १७३६ मे ३१ नंतर

॥ स्वस्तिश्रीमत्समस्तसामंतसेवकनिर्वाहेषु. कोशकृषीवल ॥ गृहपारिबर्हहर्षहेतुनीति-सेतुरक्षणनिपुणेषु. परोपकार ॥ सत्कारकरणपरायणेषु. वेदां[ते*]ष्विवपरानंदप्रकाशेषु. अ॥ स्मत् विश्वासपात्रीभूतेषु. श्री । ३ । **विहारीदासा**मात्येषु ॥ स्नेहांकि ॥ त**च्चिमणाजीवल्लाळ-पंडित**कृताशिषो विलसंतु शमत्र ॥ ॥ भवदीयमीहे विशेषस्तु इश्वरकृपया श्रीकाशीयात्रां संपाद्य ॥ ॥ श्रीमातृभिः सुखेन पुण्यग्रामे समागतं श्रीमहाराजकृपा भवतां ॥ ममता यद्य-त्साहित्यं यात्राप्रसंगे कृतं तत्सर्वं **सक्तावतजयसिंह** ॥ **लछीराममिश्रा**भ्यां अवगतं तेन परमानंदं अगान्मन्मनश्चको ॥ रः अस्मिन्विषये श्रीमतां विश्वासः स्थितः च परं अग्रेपि स्नेहा ॥ भिवृद्धिप्रीतिपरिपालनादिकुशलाः भवंत एव श्रीमातुसेवार्थं ॥ **सक्तावतजयसिंह लछीराममिश्रो** दत्तो आभ्यां संम्यक् सेवा ॥ कृता तया मातुरंतःकरणे संतोषो जातः आभ्यां मातृभिः॥ सह यात्राविषये अतीव श्रमः कृतः श्रीमहाराजाधिराजानां त ॥ था श्रीछत्रपतीनां स्नेहैक्यं वरिवर्त्ति तथैव तैः सेवां कृत्वा प्रक ॥ टीकृतं तस्मात् एतेषु यथा महाराजप्रभूणां अनुकंपा भवि ॥ ष्यति तथा श्रीमद्भिः कृत्वा देयं अत्रत्यः सर्वोपि अर्थः आभ्यां ॥ व्यक्तीभविष्यति सदैव पत्रादिना स्नेहाभिवृद्धिपूर्वकत्वे ॥ अस्मदंतःकरणं संतोषणीयं किमधिक सुज्ञेषु ॥ श्री श्री श्री ॥

### सारांश

चिमणाजी बल्लाळ → अमात्य बिहारीदास

मातुश्री काशीयात्रा संपादून सुखरूप पुण्यास आल्या. महाराजांच्या कृपेनें व आपल्या ममतेनें यात्रेच्या प्रसंगीं जें जें साह्य झालें तें सर्व सक्तावत जयसिंह आणि

लछीराम मिश्र यांजकडून अवगत झालें. परम आनंद झाला. मातुश्रींच्या सेवेसाठीं उपर्युक्त लोक दिले व त्यांनीं उत्तम सेवा केली याबद्दल मातुश्रींनाही संतोष झाला. यायोगें महाराजाधिराज व छत्रपति यांच्या स्नेहांत अभिवृद्धि होईल. यांवर महाराजांची कृपा व्हावी. येथील सर्व वृत्त ते सांगतील.

[ बाजींचिमाजींची आई राधाबाई इ. १७३६ मे ३१ रोजीं काशीयात्रेहून पुण्यास परतली ( पेद २२।३३० ). तेव्हां त्यानंतर हें पत्र लिहिलें गेलें. या पत्रांत सक्तावत जयसिंह आणि लछीराम मिश्र या दोघांना उदेपूरच्या महाराण्यानें काशीयात्रेंत राधाबाईच्या सोबतीस दिल्याचें सांगितलें आहे. आणि त्यांनीं त्यां प्रसंगांत उत्तम सेवा केली म्हणून त्यांवर उदेपूर दरबाराकडून कांहीं कृपा व्हावी म्हणून विनविलें आहे.]

---

| वि. सं. १७९२ (श्रावणादि) आषाढ शुद्धि ७ | ३ श्रीरामजी | श. १६५८ आषाढ शुद्ध ७ इ. १७३६ जुलै ३ |
|---|---|---|

सीधश्री सर्व उपमाजोग्य श्रीपचोली वीहारिदासजी जोग्य लसकरथी राजश्री रामचंद्रजीकेन आसीवचन व[च*]णा आठरा समाचार श्रीजीरी कीरपासु भला हे थाहारा सदा भला चाहिजेजी अपरं च तुमारा कागद आया समाचार सब मालम होवा श्रीमंत राजश्री रावसाहेब प्रधानजी हुकम् {कम} कर दीया फौज हजार बारा मालवामे मुकरा चौ मासामे रखी ईनका षरचकी फुरमास जो श्रीदीवा[न*]जी म्हाका रुपिया भेज देसी सो षरच कीजे सो तो अ बार तां पहुची नही श्रीजीसु अरज करि षरचकी षबर लीजो ओर वीशेष काई लीषा श्रीदीवाण तथा श्रीरावसाहेबकी जाणे हे कोई बातकी तफावत नही आब वडा छो कागदसमाचार हमेसा लीषता रहजोजी मीती आशाढ शुदि ७ समत १७९२ वर्शे

## सारांश

रामचंद्र [ बाबा शेणवी ] → बिहारीदास पंचोली

[ बाजी ]रावसाहेब प्रधान यांनीं हुकूम दिल्यावरून बारा हजार फौज पावसाळ्याच्या चार महिन्यासाठीं माळव्यांत राहिली आहे. आपणाकडून फौजेच्या खर्चाची फर्मास अजून पावली नाहीं. श्रीजीस अर्ज करून खबर घ्यावी. आपण व श्रीराव यांत कांहीं अंतर नाहीं. आपण थोर आहा.

[ या पत्राची तारीख हिंगणे दप्तर खंड १ ले. ६ वरून ठरविली आहे. ही अचूक असेल तर येथील संवत् निदान श्रावणादि तरी धरावा लागेल. चैत्रादि धरल्यास इ. १७३५ हें साल येईल. पंचोली बिहारीदास हा त्या वेळचा उदेपूरच्या महाराण्याचा दिवाण. श्रीजी म्हणजे महाराणा जगत्सिंह. याचा राज्यकाल इ. १७३४ ते १७५१. रावसाहेब प्रधान म्हणजे बाजीराव. महाराण्यानें कोणत्या कारणानें मराठ्यांस पैसे देण्याचें

कबूल केलें होतें हें या पत्रावरून नीट समजत नाहीं. तथापि याच सालीं पण या पत्रापूर्वीं बाजीराव व महाराणा यांची भेट झाली तेव्हां महाराण्यानें त्यास अर्थात् मराठ्यांस कांहीं देण्याचें कबूल केलें असावें. त्याबद्दल यांत मागणी आहे. अशा देण्याघेण्याबाबत याच प्रकरणांतील क्र. ५ चें पत्र आणि वीरविनोद खं. २; पृ. १२१९, १२२२, १२२८ यांत आलेल्या हकीकती व दिलेले कागद उपयोगी पडण्यासारखे आहेत ]

---

४ } ॥ श्री ॥ { श. १६५८ आषाढ / इ. १७३६ जुलै

॥ स्वस्तिश्रीमद्रमारमणचरणनलिनमकरंदबिंदुसंसक्तान्तःकरणेषु ॥ निजप्रचंड दोर्दंडखंडितारातिमंडलदिङ्मण्डलमाण्डिताडिंडिरपिंडपांडुरीतयशस्सु ॥ क्षत्रियकुलावतंसेषु स्वधर्मानुष्ठाननिष्ठांतः ॥ करणेषु श्रीमहाराजाधिराजश्रीराणाजगत्सिंहनृपवर्येषु श्रीम ॥ न्महाराजाधिराज —— छत्रपतीनां स्नेहपूर्वकं स्मरणं अन्य ॥ च्च श्रीमत्स्नेहेन श्रीमत तत्प्रतिदिनंमाशास्महे ॥ श्रीमद्भिः संतो ॥ पपत्रं प्रेषितं तत्प्राप्तं तेनान्त्यताल्हादः समजनि ॥ तस्मिन् प्रचुरस्नेहवादार्थान् व्यलिखन् अतः आवयो स्नेहः पूर्वपरंपराप्राप्तः अग्रे ॥ व्येव-मवतंतनीयः तदंतरायस्तनवो वोभवीति ॥ राजश्रीबाजीरा ॥ य अमात्यानां दर्शनं जातं श्रीमतां विस्तृतं वृत्तं निवेदितं यादृक् पर ॥ स्परं प्रेम रक्षणीयं तथैव तत् अनवरतपत्र लेखनेन स्नेहसंतति ॥ रवंधतां ॥ अथ च राजश्री उदेसिंहसक्तावत एतस्य ग्रामद्वयं श्री ॥ मद्भि दत्तं तत्पूर्ववत्प्रकारेण देयं इति पूर्वपत्रे लिखितमस्ति ॥ सो सदैव दीयतां सभ्यः किं बहुपल्लवितेन ------

## सारांश

छत्रपति → राणा जगत्सिंह

आपलें पत्र पाऊन आनंद झाला. स्नेहाच्या गोष्टी लिहिल्या. त्यास स्नेह परंपरा-प्राप्तच आहे. बाजीराव अमात्य यांची भेट होऊन श्रीमंतांचें वृत्त श्रवण केलें. परस्पर पत्र-लेखनानें स्नेहवृद्धि होवो. सक्तावत उदेसिंह यास दोन गाव आपण दिले ते पूर्वी-प्रमाणें द्यावे.

[ यांत छत्रपतींनीं बाजीरावाची भेट होऊन महाराण्याचें वृत्त कळल्याचें लिहिलें आहे. बाजीराव इ. १७३६ मध्यें महाराण्याच्या भेटीस गेला होता. तेथून परत येऊन याच वर्षांच्या पावसाळ्यांत शाहूस भेटण्यासाठीं सातार्‍यास गेला असतां हें पत्र लिहिलें गेलें असावें. मी वीरविनोद व राजपुतानेका इतिहास हे दोन ग्रंथ वर वर चाळले. पण त्यांत सक्तावत उदेसिंह याचा निर्देश आढळला नाहीं. कदाचित् सूक्ष्म वाचनानें आढळेल. ]

---

वि. सं. १७९३ माघ शुद्ध १४ } ५ श्री { श. १६५८ माघ शुद्ध १४
{ इ. १७३७ फेब्रुवारी ३

सीधश्री सर्व उपमाजोग्य **पचोली देवीचदजी** लीषतं लसकरथी श्रीराऊ **बाजीराऊ** मुख्यप्रधानके वचनात अपर अठाकौ समाचार भला है तुम अपना सुख-समाचार सदा लपावजो आगे साल गूदस्तैके मेजमानीबाबत रुपया १००००० ) लके लाप वा **बनेडे** परगनेके **उनालीबाबत** रुपया ४५००० ) अके पचेतालीस हजार बाकी रही छे तुम दरमान हो अब तै वसुल दीया नही तो अंघ भली बात नही चेपलासमे तफावत परेगी ईस सवब लीपा छे तो येक लाप पचतालिस हजार सीताब भैज दे बाकी हकीकत पंडीत **सदासीवजीकौ** लीपी है तुमकौ कहेगे मीति **माघ सुद १४ संवत १७९२**

## सारांश

बाजीराव मुख्य प्रधान → देवीचंद पंचोली

साल गुदस्तांच्या मेजवानीचे एक लाख रुपये आणि बनेडे परगण्यांतील उनाळी गावाबाबत पंचेचाळीस हजार रुपये अशी बाकी आपणाकडे राहिली आहे. तुम्ही दरम्यान आहा. अजूनही वसूल दिला नाहीं तर तें ठीक नाहीं. विश्वासांत फरक पडेल. वरील रक्कम सत्वर पाठवावी. इतर हकीकत सदाशिव पंडितास लिहिली आहे. ते सांगतील.

[ या पत्रांतील पंचोली देवीचंद पंचोली बिहारीदास याचा नातेवाईक असावा. इ. १७३६ मध्यें बाजीरावानें उदेपुरास भेट दिली तेव्हां त्याच्या स्वागतार्थ मेजवानी ना( दिली असेलच. पण तत्कालीन रीतीप्रमाणें मेजवानीबद्दल कांहीं रकमही देण्याचें कबूल केलें असावें. वीरविनोद खंड २, पृ. १३२८ वर दिलेल्या हकीकतींत बनेडे परगण्याचा वसूल पेशव्यांकडे जाई असें सांगून तेथेंच दिलेल्या पत्रांत संवत् १७९२ पासून १७९९ पर्यंत पेशव्यांकडे भरणा व्हावयाच्या व झालेल्या पैशांचा हिशेब दिला आहे. त्यांत मेजवानीचे दोन लाख व उनाळूचे सं. १७९२ बद्दलचे पंचेचाळीस हजार रुपये पेशव्यांस द्यावयाचे असें दाखविलें आहे. येथें उनाळी(ळू) बाबत पंचेचाळीस हजारच सांगितले आहेत. पण मेजवानीचे एक लाख रुपये नमूद केले आहेत. वीरविनोदांतील पत्रांत पंचोली देवकरण निर्देशिला आहे. वीरविनोद खं. २, पृ. १५२१-२५ मध्यें आलेल्या वि. सं. १८०० ( इ. स. १७४३ ) च्या महाराणा जगत्सिंहाच्या विश्वास-पात्र अमात्य म्हणून एक पंचोली देवजित् आला आहे. तो नर हा मरोत्तर... बिहारीदास इ. १७३६ मध्यें मेला असल्यास इ. १७३७ मध्यें हा येथें निर्देशिला जाणें शक्य आहे. ]

---

फाल्गुन असित १० } ६ श्री { श. १६६० फाल्गुन वद्य १० इ. १७३९ मार्च २३

०॥स्वस्ति श्रीमदुमारमणचरणनलिनयुगलानवरतचिंतनपरायणांतःकरणतावाप्तसमस्तपुमर्थेषु ॥ सौजन्यसिंधुषु ॥ अस्मत्परमाप्ततमेषु ॥ **धात्रेयभातूजित्सु** ॥ **बाजीरावबल्लालपंडित**प्रधानाविहिताशीःकदंबकमाविरस्तातराम् ॥ **फाल्गुनासित दशम्य**वधिकमत्रत्यं शमावेदयन्नत्रत्यं तत्परिपृच्छति वर्णनिकरदूतोयम् ॥ गोचरश्च ॥ इंद्रप्रस्थे समतीत उदंतो भवद्भिर्विज्ञात एव स्यात् ॥ तर्हि भवतां प्राधान्यसमसमयमयमुदंतः समुदितोस्ति ॥ तर्हि श्रीदिवाणजीकान्प्रति इतः प्रेषितपत्रानुकूल्येन स्वधर्मसंरक्षणानुकूलं यथा तथा ते रोधनीयाः अन्यथा शत्रोः प्रभावमात्रमालक्ष्यानुद्योगेनावस्थाने ऐहिकामुष्मिकविघात एव स्यात् ॥ श्रीदिवाणजीद्भिः भवतां प्राधान्यं दत्तं श्रुत्वा परमानंदः समजनि ॥ समजनि च यथास्मन्मानसं ॥ तर्हि एतत्समसमयं दत्तप्राधान्यसार्थक्यमिच्छूनां भवतां अथ च दीवाणजीकान्प्रति सेवां प्रदर्श्य जनुषः साफल्यमिच्छूनां अस्माकं चायमेव समय आस्ते ॥ विशेषस्तु **राणावत खुमाणसिंहाविजयसिंह**मुखवचनात् इत प्रेषितदीवाणजी**सदाशिवपंडित**पत्राच्चावगतो भविष्यतीत्यलं ॥ — ॥

अन्यच्च श्रीमद्भिः **सवाईजयसिंह**प्रभृतिनामैक्यं संपाद्य सर्वहिंदूनां सेनासमुदायः एकत्र स्थापनीयः सपादलक्षपरिमिता सेना भविष्यति भवतां ॥ अस्माकं च सर्वोपि सेनासमुदाय आयास्यति सर्वा सेनां लक्षद्वयपरिमितां संपाद्य शत्रुपराजये यतनीयं अन्यथा हिंदूनां शौर्यं स्वधर्मश्च अबुद्बुदवद्देव स्यात् ॥ भवद्भि**र्मल्लारपंडित**विषये यदलेखि तत्तु अस्मन्निकटे **मल्लाररावहोलकरः** समागतश्चेत् तस्य दंडनं करिष्यामः भवद्विरोधी सेवकः अस्मत्किकार्यावह इति तु भवद्भिर्विज्ञायत एव ॥ भवतामस्माकं च स्नेहे सति महत्कार्यं भावि तत्र एतादृशपामराणां गणना का इदमपि भवद्भिर्विज्ञायत एवेत्यलं ॥ यथा भवतां मनसि यावान् विचारः स सर्वोपि यथाकालं साधयामः

## सारांश

बाजीराव बल्लाळ पंडित प्रधान → धायभाऊ

फाल्गुन वद्य दशमीपर्यंत कुशल आहे. इंद्रप्रस्थ येथें घडलें तें आपणांस समजलें असेल. आपल्या प्राधान्याचा समय आला आहे. त्यास येथून पाठविलेल्या पत्राच्या धोरणानें दीवाणजी स्वधर्मसंरक्षणानुकूल होतील असें करावें. नाहीं तर शत्रूचा प्रभाव पाहून स्वस्थ बसल्यास ऐहिक व पारलौकिक दोन्ही प्रकारच्या कल्याणाचा विघातच होईल. दिवाणजींनीं आपणांस प्राधान्य दिलें हें ऐकून परमानंद झाला. दिवाणजींना सेवा करून दाखवून प्राधान्य दिल्याचें सार्थक करूं इच्छिणाऱ्या आपणांस आणि जन्मसाफल्याची इच्छा करणाऱ्या आम्हांस हीच संधि आहे. राणावत खुमाणसिंह व विजयसिंह यांच्या सांगण्यावरून आणि सदाशिव पंडित यांस पाठविलेल्या पत्रावरून विशेष अवगत होईल.

शिवाय तुम्ही सवाई जयसिंहप्रभृतींचें ऐक्य संपादन करून सर्व हिंदूंचा सेना-समुदाय एकत्र करावा म्हणजे आपली सव्वा लक्ष सेना होईल. आमचाही सर्व सेना-समुदाय आल्यावर दोन लक्ष सेना होईल. मग शत्रुपराजयाचा यत्न करावा. नाहीं तर हिंदूंचें शौर्य व स्वधर्म बुडाला असें होईल. आपण मल्हार पंडिताविषयीं लिहिलें. त्यास मल्हारराव होळकर आमचे जवळ आल्यावर त्यास (पंडितास) शिक्षा करूं. आपणांशीं विरोध करणारा चाकर आमच्या काय कामाचा हें आपण जाणता. आपला व आमचा स्नेह असतां महत्कार्य होणार. तेथें अशा प्रकारच्या पामरांची काय किंमत हेंही आपण जाणता. आपल्या मनांत जो विचार असेल तोच योग्य वेळीं साधूं.

[ हें पत्र अर्थदृष्ट्या फार मनोहर आहे. हें उदेपूरचा महाराणा जगत्सिंह याच्या धायभावास उद्देशून लिहिलें आहे. येथें त्याचें नाव दिलें नसलें तरी ' पंतप्रधान यांचे सेवेसी ' म्हटल्यानें ज्याप्रमाणें आपण न विचकतां संदर्भास धरून असलेला पंतप्रधान घेतो तद्वत् येथें करावयाचें आहे. यावेळीं जगत्सिंहास नगराज या नावाचा धायभाऊ असून तो उदेपूरच्या कारभारांत मोठा महत्त्वाचा पुरुष गणलेला दिसतो. तेव्हां तोच येथें विवक्षित आहे. त्यानें उदेपूरच्या महाराण्याच्या वतीनें (चैत्रादि) विक्रम संवत् १७८९ (पौर्णिमांत) चैत्र वद्य ९ रोजीं मल्हारराव (होळकर), राणोजी (शिंदे) आणि आनंदराव (पवार) यांशीं केलेला करार वीरविनोद खंड २, पृ. १२१९ वर प्रकाशित झाला आहे. त्यावरून त्याच्या महत्वाची कल्पना येते. फाल्गुनासित दशमी याचा अर्थ काय करावयाचा ! सित म्हणजे जर शुक्ल तर असित म्हणजे कृष्ण हें उघड झालें. पण असित-गिरि म्हणजे हिमालय हा अर्थ असल्यानें असित म्हणजे शुक्ल असा अर्थही होणें शक्य दिसतें. पण येथें मी असित म्हणजे कृष्ण समजतों. या तिथीपूर्वी इंद्रप्रस्थ अथवा दिल्ली येथें असें काय झालें कीं, ज्याचा उल्लेख बाजीरावानें आपल्या पत्रांत करावा ! मला वाटतें या निर्देशानें नादिरशाहाची भारतावरील स्वारी विवक्षित असावी. मग या पत्रास २३।३।१७३९ इ. ही इंग्रजी तारीख बसते. या तारखेच्या पूर्वी सुमारें एक महिना नादिरशाहाच्या स्वारीचा प्रलय दिल्लीस चालू झाला होता. तिच्या अंगावर शहारे आणणाऱ्या बातम्या महाराष्ट्रांत बाजीरावासारख्याच्या कानीं आल्यावर त्यानें हें पत्र लिहिलें असावें. राणावत खुमाणसिंह व विजयसिंह यांचे उल्लेख इतरत्र आढळले नाहींत. सदाशिव पंडिताचा म्हणजेच सदाशिव बल्लाळ या गृहस्थाचा निर्देश वीरविनोद खंड २, पृ. १२२८ आणि पेद ९।१२; १४।३४१; ३०।१२८, १३४, १४२, १४३ इत्यादींमध्यें आला आहे. मल्हार पंडित कोण हें ध्यानांत येत नाहीं. मल्हारराव होळकर प्रसिद्ध आहे. या पत्रांत सर्व राजपूतमराठे–बाजीराव व त्याचे सरदार, महाराणा, सवाई जयसिंह इत्यादि–हिंदूंनीं दोन लाख सेना एकत्र करून शत्रूचा अर्थात् नादिरशाहाच्या परचक्राचा पराभव केला तर हिंदूंचें सामर्थ्य एकदम प्रत्ययास येऊन मुघल साम्राज्य आयतेंच सर्वस्वीं त्यांच्या ताबींत होईल. नाहीं पेक्षां मुसलमानांचा

वरचष्मा कायम राहून हिंदूंचें कर्तृत्व व त्यांचा धर्म या दोहोंचा ऱ्हास होईल अशी कल्पना पुढें मांडण्यांत आली आहे. नादिरशाहाच्या स्वारीमुळें चकत्याची–मुघली पादशाही बुडाली हें वस्तुनिदर्शन बाजीरावानें निदान दोन ठिकाणीं केलें आहे ( ब्रह्मेंद्र-चरित्र ले.४१, पेद १५।७५ ). आणि नादिरशाहाचें म्हणजे परक्याचें राज्य तर सर्वांसच त्रासदायक होईल ही कल्पनाही त्यानें बोलून दाखविली आहे ( पेद १५।७२ ). येथें त्यापुढें जाऊन सर्व हिंदूंनीं एक होऊन आपला प्रभाव दाखवावा आणि धर्मरक्षण करावें अशी कल्पना मांडली आहे. ]

---

७.

॥ श्री ॥

{ श. १६६१ आषाढ शुद्ध ४
{ इ. १७३९ जून २८

श. १६६१ सिद्धार्थी }
शुचि शुक्ल ३ }

॥ श्रीगौरीपति ॥ ॥ श्रीतुलजा ॥

स्वस्ति श्रीमत्सुरासुरनरकिंनरनिकरोरगपतिमौलिमालाविलसत् सुमनोराजिनीराजित चरणांबुजागसुतांगीकृतवामांकसंन्निविष्टसर्वमंगलासप्रेमावलोकनप्रमुदितपरमशिवचरणनालिन-समासादितनिरतिशयभूमंडलैश्वैर्यसंतोषिताथिंनिवहजेगीयमानयशस्तोमसोमप्रकासितदिगंतरा-लेषु ॥ प्रबलप्रत्यर्थिपृथ्वीपतितिमिरहरणपटुतरप्रौढप्रतापदिनकरविद्योतमानेषु ॥ चरणप्रचारणप्रवर्त-सुहृत्समूहविकसनकुमुदबांधवेषु ॥ पूर्वपूर्वधन्यराजन्यधुरिणाचरितधर्मांचरणप्रचारणप्रवर्त-मानानुवर्तमानकायवाङ्मनोवृत्तिषु ॥ अस्मत्परमामित्रेषु ॥ श्रीमन्महाराजाधिराजमहाराणा **श्रीमज्जगत्सिंह**नृपवर्येषु ॥ श्रीमन्महाराजाधिराज**शंभुराज**छत्रपतिनृपवर्यांणां ॥ श्रीस्मरणपूर्वकं विहितं स्मरणं अत्रत्यं श्रीमद्देवाधिदेवसेवितपादारविंदायाः प्रसादात् **शुचिशुक्लतृतीया**वधिज्ञांत्वा भवदीयं स्वास्तिलेखनेन ।मत्रांस्ति ॥ अत्रत्यं भद्र **शुचिशुक्लतृतीया** सुदिने प्राप्तः तदवलोकनेन वय आनंदीयास्मः विशेषस्तु भवद्भिः प्रेषितो पत्रदूतो सुदिने प्राप्तः तत्र लिखितं अवयोर्ऐक एव चेतासि यः समारंभो जातः स पत्रलेखनेन न तृप्ताः तत्र लिखितं अवयोर्ऐक एव व्यवहारोति तर्हि तत्सर्व सम्यगेव अथच आषाढकृष्णसप्तम्यां कुमार**प्रतापसिंह**स्य विवाहोस्ति तर्हि भवद्भिः सहपरिवारेण एत्य उत्सवो द्रष्टव्य इति लिखितं अत ऊर्ध्वं किमस्त्व-धिकं यत्र भवंतः संतः तत्र वयं तिष्टामः विवाहोत्सवं कृत्वा जातविवाहानंदलेखनेन मनः संतोषणीयम् **भूरसषडिलाभू**संख्ये वर्षे **।सिध्दार्थी** वत्सरे लिखितोयं वर्णनिकरदूतः किमधिक सूज्ञतमेषु आप्ततमेषु लेखनाडंबरेण त्यलम् ॥

## सारांश

छत्रपति शंभुराज ( संभाजी ) → ( महाराणा ) जगत्सिंह

आपलें पत्र पावलें. आनंद झाला. आपण लिहिलें कीं, आपला दोघांचाही एकच [illegible] तें एकच आहे. आषाढ कृष्ण सप्तमीस कुमार प्रतापसिंहाचा विवाह आहे.

सहपरिवार येऊन उत्सव पहावा म्हणून लिहिलें. त्यास जेथें आपण तेथें आम्ही आहोंच. विवाहोत्सव होऊन आनंद झाल्याचें लिहावें व संतोष द्यावा.

[ येथील शंभुछत्रपति म्हणजे कोल्हापूरचा संभाजी. प्रतापसिंह हा महाराणा जगत्सिंहाचा मुलगा. या पत्राच्या तारखेविषयीं थोड्या शंका आहेत. येथें वर्षसंख्येचा निर्देश 'भूरसपडिलाभू' असा केला आहे. या शब्दांनीं सूचित होणारी संख्या ११६६१ येते. तेव्हां यांतील पहिला १ अर्थात् शेवटचा भू गाळला पाहिजे. म्हणजे १६६१ ही संख्या उरते. ही संख्या शक वर्षांची धरली म्हणजे सिद्धार्थि संवत्सर त्याशीं जुळतो. आषाढ कृष्ण सप्तमी हा निर्देश पौर्णिमांत आषाढाचा धरावा तर हें पत्र लिहिण्याच्या सुमारास विवाह होऊनही गेला असेल. अमांत आषाढाचा धरावा तर उदेपुराहून आलेल्या पत्रांत अमांताचा उल्लेख सहसा यावयाचा नाहीं. तेव्हां येथें मुळांत असलेल्या पौर्णिमांताचा अमांत करून घातला असेल काय? पौर्णिमांत आषाढ वद्य= अमांत ज्येष्ठ वद्य; अमांत आषाढ वद्य = पौर्णिमांत श्रावण वद्य. कांहीं असलें तरी अमांत आषाढ वद्यांत लग्नाचे मुहूर्त असण्याची शक्यता कमी असल्यामुळें येथील आषाढ कृष्ण पौर्णिमांत असावा.]

---

८

श्री

{ श. १६५५
{ इ. १७५४ नुमार

॥ श्रीमदशेषप्रशस्तराजन्यवृंदमौलिवंदितचरणारविंदस्वदोर्दंडासादितोर्जितक्षत्र ॥ ॥ कुलवरेषु प्रचंडभुजदंडखंडितारातिशुंडपुंडरीकांचितयशोजलधिसोद्भवराज ॥ ॥ लक्ष्मीनयनां-चलविभ्रमैकपात्रेषु ॥ अनवरतार्थिसार्थेष्टवितरणसमुच्छलत्का ॥ सितिनाभिराजेषु ॥ श्रीम-न्महाराजाधिराजमहाराणानृपकेसरिषु ॥ श्रीमज्जगत्सिंहदेवानां शाहूछत्रपतीनां कर्णाद्‍-ज्ञापकोयं वर्णदूतः ॥ श्रीमत्कृपया शमत्र वयमपि उभयराजद्वारद्वयस्य शमिच्छामहे । कुतः उभयस्य व्यवहारस्त्वेक एव अन्यश्च श्रीमत्प्रेषितलेखेन्दुकौमुदीनिरीक्षणेन लोचनयोः ॥ कुनयोर्निरतिश[य]तुष्टिर्जनिता युष्मत्प्रेषितजयसिंहशूरसिंहाभ्यागतौ नम्रू ॥ [न] नीरजाभ्यां सर्वोप्युदन्तः श्रुतिगोचरीकृतः तादृशमेव भविष्यति अन्योन्यं ॥ ......मयां भूयो भूयो विनयातिशयप्रकाशलेखचोरानंदनीया पर्वा ॥ ......मधे पत्रविशेषार्थं [नि*]सुज्ञाप्रति विशेष काय लीहीणें ॥

## सारांश

१ — महाराणा राजसिंह

जगत्सिंह व शाहू छत्रपति यांच्या मैत्रीचें पत्र पाठविलें आहे. मैत्री ... आहे. आम्हीही दोन्ही राजद्वारांचें कुशल इच्छितों. कारण दोघांचा व्यवहार ... आहे. आपण पाठविलेले जयसिंह व शूरसिंह येथें येऊन पावले. त्यांनीं ... सांगितलें आहे.

---

## १२ उदेपूरच्या व्यास घराण्याकडील कांहीं पत्रें

{ श. १६९१
{ इ. १७६९ सुमार

१

॥ श्री ॥

॥ स्वस्तिश्रीमदमंदाकिनीसंदोहसंपूरिताशेषजटा ॥ मंडलपरिलसच्छिवचरणद्वंद्व-
निर्द्वंद्वभजनासा ॥ दितसमस्तपुमर्थसार्थसार्थकीकृतनिजवंशाव ॥ तारेषु पूर्वपूर्वधन्य-
राजन्यमूर्धन्याचरितधर्मांचार ॥ णप्राचारणचातुरीधुरीणेषु ॥ सौजन्यसिंधुषु ॥
॥ श्रीमहाराजाधिराजमहाराणाश्रीमदरिसिंव्हनृ ॥ पवर्येषु ॥ पंडितरामचंद्रगणेश-
चरितमाषा ॥ कर्दंबमावेदयेत्ययं वर्णनिकरः शमत्र श्रीमत्कृ ॥ पया श्रीमंत तदनुदिन
मेधमानमिहामहे ॥ गोचरः ॥ स्तु श्रीमद्राज्यवृत्तं पंडितविष्णुमहादेवशिवाकां-
॥ तभट्टैर्विविचोक्तमत्रापि येशवंतरावबाबल्या ॥ प्रभृतिभिः लिखित शट्त्रिंश-
लक्षाणि गृहित्वा कृ ॥ त्रिमनृपपक्षपातो विधेयो इति पर त्वस्माभि ॥ नांगीकृतं श्रीमत्प्रांत
सत्वरमेवागम्या स्वामिद्रो ॥ हकेभ्यो शासने कृत्वा श्रीमदीयाज्ञा प्रवर्तविश्या ॥ मो विशेषो-
दंताः शिवाकांतभट्टपत्रद्वारा ज्ञेय इ ॥ त्येलं पल्लवितेन ॥

### सारांश

रामचंद्र गणेश ( कानडे ) → महाराणा अरिसिंह

इकडील राज्याचें वृत्त विष्णु महादेव व शिवाकांत भट्ट यांनीं विस्तारानें सांगितलें सेल. यशवंतराव बाबळे वगैरेंनीं लिहिलें कीं, छत्तीस लाख रुपये घेऊन तोतया राजाचा पक्ष घ्यावा. परंतु तें आम्हीं कबूल केलें नाहीं. आम्ही लवकरच त्या प्रांतीं येऊन स्वामिद्रोह्यांना शासन करून आपला अमल चालू करून देऊं.

[ यांत आलेला अरिसिंह वर आलेल्या जगत्सिंहाचा मुलगा होय. जगत्सिंहानंतर त्याचा थोरला मुलगा प्रतापसिंह आणि त्यानंतर त्याचा मुलगा राजसिंह गादीवर आला. पण तो निःसंतान मेल्यावर त्याचा चुलता किंवा प्रतापसिंहाचा धाकटा भाऊ अरिसिंह इ. १७६१ मध्यें गादीवर आला आणि इ. १७७३ मध्यें मेला. रामचंद्र गणेश कानडे हा थोरल्या माधवरावाच्या कारकिर्दींत उत्तरेंत झालेल्या स्वारींतील एक मुख्य सरदार होता. विष्णु महादेव गद्रे हा सावकारी पेशाचा मनुष्य उत्तर पेशवाईत उत्तरेंतील विशेषतः राजपुतान्यांतील मामलती करी. शिवाकांत भट्टाचें नांव चटकन् कोठें आढळलें नाहीं. यशवंतराव बाबळे इ. १७८५ मध्यें जयपूरकरांकडून मारला गेल्याचें दिसतें ( महादजी शिंदे यांचीं कागदपत्रें क्र. ३५१ ). उपर्युक्त राजसिंह मेला तेव्हां त्याची राणी गरोदर होती. पण अरिसिंहाच्या भयानें ती गोष्ट लपविली गेली. पुढें तिला मुलगा झाला. त्याचें नांव रत्नसिंह. अरिसिंहाच्या वागणुकीस कंटाळून राज्यांतील कित्येक उमरावांनीं याच्या पक्षाचा पुरस्कार केला. परंतु रत्नसिंह वयाच्या सातव्या वर्षी देवी येऊन मरण पावला. पण बिथरलेल्या सरदारांनीं त्याच्याच वयाच्या दुसऱ्या एका मुलास रत्नसिंह नांव देऊन त्याच्या तर्फे अरिसिंहाशीं विरोध चालू ठेवला आणि मराठ्यांची मदत घेण्याचा प्रयत्न केला ( राजपुतानेका इतिहास २।९५६–९६४ ). या पत्रांत कृत्रिम नृप ... या दुसऱ्या रत्नसिंहाला उद्देशून असावा. ]

सु. ११७९ शव्वाल २१ } १० {श. १७०० कार्तिक वद्य ७
श्री {इ. १७७८ नोव्हेंबर ११

दस्तक अज सरकार श्रीमत राजश्री नारायेणराव बार्गळ याणी कमाविसदाराण. चं ठाणेदारान व जमीदारान व नाकेदारान व बाजे लोक माहालाणिहाये सुा तिसा सबैन मया अलफ मो वनूढा येथून सरमजाम कोठीस बैल सुमार ३५ पस्तीस व सुदधा सुमार ४ च्यार व पोरगे सुमार २ दोन व लद(म्ह)सी सुमार ४ च्यार व तटे सुमार ३ व मानसे सुमार २५ पचेवीस येकून तीस असा– वगैरे सरमजाम किले राणोद्यास ज्यात अहे यासी मार्गामधे कोन्ही हासुलाविशई दिकत न करता नदीनाला अंपलाली हद पार करून देणे रात्री ज्या वस्तीमधे राहातील तेथे चवकीपाहऱ्याचा जापता ठेऊन कोन्हे गोष्टीचा उपद्रव न देणे [नि*] जाणिजे [नि*] छ २१ माहे शवाल [व*]
॥ श्री ॥ । मोर्तब । सुद

[कागदाच्या पहिल्या दोन ओळींच्या उजव्या अंगास बदामी शिक्यांत*]
॥ श्री ॥ । कृष्ण चरणी । तत्पर भोजराव । सुत नारायनरा । व बारगल

---

वि. सं. १८३७ (श्रावणादि) वैशाख वद्य ३ } ११ ॥ श्रीरामजी ॥ { श. १७०३ चैत्र वद्य ३ इ. १७८१ एप्रिल ११

॥ स्वस्त श्रीमन्नीपीलनीगदीतलीलोमारमणचरणशरण ॥ महाराणाजी श्रीभीमसींघजीके सेवामे सुबेदार श्रीमा ॥ धोरावजी सींदेकेन बंचे ईहाका समाचार आपके रु ॥ पातो भला हे आपका सदा भला चाहीजे आप चा ॥ घणा दीन हुवा कागद समाचार आया न्ही सों याद ॥ कर कागद लीपावेगा ईहाका समाचार सावतभी ॥ म सींघकु लीण्या हे तथा पंडत गोवींदरावजीकु ॥ ॥ लीण्या हे जीसु मालुम होवेगा मिति वैसाप ॥ वदी ३ सं ॥ १८३७ मुा गुजरात

## सारांश

माधोराव शिंदे → महाराणा भीमसिंह

येथील समाचार सावंत भीमसिंह व पंडित गोविंदराव यांस लिहिला आहे त्यावरून समजून येईल. आपला समाचार कळवावा.

[अरिसिंहाचा धाकटा मुलगा महाराणा भीमसिंह इ. १७७८ मध्यें गादीवर आला व इ. १८२८ मध्यें मेला. माधोराव शिंदे म्हणजे महादजी शिंदे. भीमसिंह गादीवर बसल्यानंतर थोडे दिवसपर्यंत झालेल्या घडामोडींत रावत भीमसिंह येतो; पण सावंत भीमसिंह आलेला मला आढळला नाहीं. पंडित गोविंदराव म्हणजे गोविंदराव पुरुषोत्तम हिंगणे तर नसेलना?]

---

# १३ फ्रॅन्सिस मार्टिनच्या रोजनिशींतील उतारे

१३ फ्रॅन्सिस मार्टिनच्या रोजनिशींतील उतारे

(रा. ब. डॉ. गो. स. सरदेसाई, कामशेत.)

फ्रॅन्सिस* मार्टिन हा फ्रेंच इंडिया कंपनीचा एक हुशार अंमलदार होता. त्यानें पांदिचरीची स्थापना करून फ्रेंचांच्या व्यापाराची भरभराट केली. ही वसाहत स. १६७५ त सिद्ध झाली ती अद्यापपावेतों चालत आहे. फ्रेंचांची राज्यवृद्धि पूर्वप्रदेशांत करणारा मार्टिन हाच पहिला प्रमुख गृहस्थ होय. हा गृहस्थ ता. ३० डिसेंबर स. १७०६ रोजीं पांदिचरी येथें मरण पावला. सन १६७७ त शिवाजीनें कर्नाटकावर स्वारी केली तेव्हां मद्रासचे इंग्रज व पांदिचरीचे फ्रेंच यांनीं त्याची समजूत काढून आपला बचाव केला. मार्टिननें आपल्या कारभाराचीं टिपणें लिहून ठेविलीं तीं पुढें प्रसिद्ध झालीं. त्यांत शिवाजी, संभाजी, राजाराम यांच्याशीं त्याचे व्यवहार घडले त्यांचा निर्देश आहे, तो बहुमोल होय. स. १६८९ पासून १६९३ या पांच सालांतील बरीचशी माहिती मार्टिनच्या या लेखांत असून, तींत राजाराम व जिंजीचा वेढा यांचे तपशील भरपूर उपलब्ध होतात. १६९४ त पांदिचरी ठाणें डचांनीं जिंकलें व मार्टिन कांहीं वर्षें त्यांच्या कैदेंत पडला.

जिंजीच्या वेढ्यांतील मराठ्यांच्या बाजूची इतकी तपशीलवार माहिती दुसरीकडे उपलब्ध नाहीं. झुल्फिकारखान व राजाराम यांचें अंतस्थ सूत कसें जुळलें होतें, कृष्णाजी अनंत (सभासद) हा केवढा प्रमुख गृहस्थ होता, मराठे व मोगल या दोघांच्या झगड्यांत पांदिचरीचे फ्रेंच आपला बचाव कसा करीत होते वगैरे अंतस्थ माहिती या लेखांत मिळते ती मराठी इतिहासास उपयोगी आहे. मूळ फ्रेंच ग्रंथाच्या पृष्ठांचे आंकडे व तारखा दाखल केल्या आहेत.

## उतारे

पृ० ३३ ] याच महिन्यांत [ मार्च स. १६८९ ] बातमी आली कीं संभाजी राजास मोगल फौजांनीं पकडून घेतलें. राजाच्या कित्येक ब्राह्मण सल्लागारांनीं (कवि-कलशच्या द्वेषानें) राजाशीं बेइमान होऊन मोगलांस त्याच्या मुक्कामाची वर्दी दिली. मोगल लष्कराच्या सेनानायकांशीं त्या ब्राह्मण कारभाऱ्यांनीं अगोदरच सूत जमविलें होतें.

पृ० ३९ ] एप्रिल. जिंजीच्या सुभेदारास बातमी आली कीं शिवाजीचा दुसरा पुत्र रामराजास–छत्रपतीच्या गादीवर बसविण्यांत आलें. संभाजीचा पुत्र होता, त्याचा हक्क मानला नाहीं. ज्या ब्राह्मणकारभाऱ्यांनीं संभाजीचा विश्वासघात केला, त्यांनींच राम-राजाचा पुरस्कार केला. संभाजी–पुत्रास गादीवर बसविलें तर तो वयांत आल्यावर पुढें

* [illegible] ३८ वें = इ. १९५१ जून ४

आपला सूड घेईल या भीतीनें कारभाऱ्यांनीं ही कारवाई केली. तथापि शाहूचा पक्ष उचलून धरणारे कांहीं लोक आहेतच.

पृ. ४६ ] जून १६८९. या महिन्याचे अखेरीस जिंजी येथें मराठे व मोगल लष्कर यांची लढाई होऊन दोहों पक्षांचे कांहीं लोक पडले; दोघांची बरोबरी होऊन ते आपापल्या ठाण्यांत परत गेले.

गोवळकोंड्याहून आमच्याकडे बातमी आली कीं संभाजीचें शीर कापून तें मिरविण्यांत आलें. हाच प्रकार बादशहाच्या मुक्कामावरही जाहीर करण्यांत आला.

पृ. ४९ ] जुलई १६८९. जिंजीच्या मराठी लष्करानें मोगलांचा पराभव केला. मोगल लष्कर आपल्या तळमुक्कामीं परत गेलें.

पृ. ५५ ] स. १६८९ च्या ऑक्टोबर आरंभीं बातमी आली कीं जिंजीचा सुभेदार हरजीराजे महाडिक मरण पावला. तो आठ दहा दिवस आजारी होता.

पृ. ५९ ] ऑक्टोबर १६८९. कर्नाटकांतील हिंदूंचीं सर्व मंदिरें पाडून टाकण्याचा बादशहाचा हुकूम आला असून त्यामुळें हिंदु लोक हवालदील झाले आहेत. बादशहाच्या लष्करांत लक्ष्मीनायक म्हणून एक हिंदु सरदार आहे. कांहीं पायदळ व कांहीं स्वार ठेवून त्यानें बादशहाची नोकरी पत्करिली. नोकरी पत्करतांना त्याला वचन दिलें होतें कीं तुमच्या मंदिरांस उपसर्ग होणार नाहीं. परंतु हिंदूंचीं मंदिरें पाडण्याचा हा नवीन हुकूम आल्याबरोबर लक्ष्मीनायकानें तेथील पाळेगारांस कळविलें, तुम्ही आतां जास्त फौज तयार करा. आपलीं मंदिरें मुसलमान पाडूं लागतील तर त्यांच्याशीं आपण लढून त्यांचा पाडाव केला पाहिजे.

पृ. ६४ ] नोव्हेंबर १६८९. राजाराम योग्याचा वेष घेऊन चार ब्राह्मण सरदारांसह वेलोर येथें दाखल झाला. वेलोरचें ठाणें जिंजीच्या हुकमतींत आहे. वाटेनें त्याचे फार हाल झाले. सहाशें मैलांचा हा सर्व प्रवास राजानें पायींच केला. मोगलांनीं ओळखूं नये म्हणून त्यांनीं वेष पालटले होते. वेलोरच्या अधिकाऱ्यांनीं त्यास ओळखून ठाण्यांत घेतलें. जिंजीचा अधिकारी हरजीराजे महिन्यापूर्वी मरण पावला. पण त्याची बायको शिवाजीची कन्या राजारामास दाद देईना. तथापि तिचा पक्ष बलवान् नव्हता. राजाराम जिंजीस येतांच तिनें ठाणें त्याच्या हवालीं केलें. नवऱ्याचा व तिचा धनसंचय होता तोहि सर्व तिनें राजारामास दिला. जिंजीच्या अधिकाऱ्यांनीं व लष्करानें राजारामाची हुकमत मानली. जिंजीस मराठी राज्याचा कारभार चालू झाला.

पृ. ६७ ] डिसेंबर १६८९. राजारामास मोठी अडचण पैशाची. फौजेशिवाय निभाव कसा लागावा! पैशाशिवाय फौज कशी जमणार! जवळ मुख्य कारभारी प्रल्हाद निराजी होता. त्यानेंच शत्रूंचें निवारण करून राजारामास सांभाळून सुखरूपपणें इतक्या दूर आणिलें; नाना संकटांस तोंड देऊन त्याचा बचाव केला. पुष्कळदां राजा-

रामाचे पाय चालेनात तेव्हां त्यास प्रल्हादपंतानें आपल्या पाठुंगळीस घेऊनहि वाहून नेलें. अर्थात् त्याजकडेच राजारामानें जिंजी येथें आपला सर्व कारभार सोंपविला; जणूं काय हा प्रत्यक्ष बापच असा त्याचा मान राजाराम ठेवतो.

परंतु असा हा कारभारी निस्पृह थोडाच राहणार. त्याचाहि स्वार्थी डाव होताच. त्यानें राजारामास खुशालचैनीची चटक लावली. पहिल्याच तीन महिन्यांत (पृ. ६८) त्यानें तीन चार बायकांशीं रामराजाचे विवाह जमविले. हिंदूंचा कोणताहि समारंभ म्हटला कीं त्यास नर्तकी तर अवश्यच पाहिजेत. प्रल्हादपंतानें या नर्तकींचे तांडे राजारामास आणून दिले. मग त्याच्या उपभोगास सीमा काय? दुसरें कृत्य प्रल्हादपंतानें केलें तें पैसा जमविण्याचें एक न्यायासन उभारलें, त्याजपुढें पूर्वीच्या अंमलांतले सर्व ब्राह्मण व इतर अंमलदारांस आणून त्यांजकडून पैशाची मागणी केली. नंतर व्यापारी, सावकार, दुकानदार ज्या कोणाजवळ पैसा आहे अशी खबर लागे त्यांजकडून पंतानें पैसे जमविले. त्यानें सर्वत्र जाहिरात कळविली कीं आपले प्रभु छत्रपति या देशांत आले, त्यांचें दर्शन घेऊन नजराणा करणें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. प्रत्येकानें आपापल्या शक्त्यनुसार प्रस्तुतच्या संकटांत छत्रपतींचें साह्य केलें पाहिजे.

पृ. ६८–७१ ] कोलांदे नांवाचा आमच्या वखारींतला दुभाषा क्रिस्ती असून कैक वर्षे इमानानें नोकरी बजावीत आहे. या गृहस्थानें चोरीनें पुष्कळ पैसा जमविला असून त्याचा फैसला करण्यासाठीं आमच्या कोर्टापुढें तावडतोब पाठवा अशी मागणी प्रल्हादपंतानें आमच्याकडे पाठविली आहे.

पृ. ७२ ] डिसेंबर स. १६८९. बादशहाच्या हुकुमानें मुसलमान लोक हिंदूंचीं मंदिरें पाडूं लागले असें पाहून लक्ष्मीनायकानें बादशहाची नोकरी सोडून तो जिंजीच्या अंमलाखालीं दाखल झाला. त्यानें प्रांतांत सर्वत्र आदेश दिला आहे कीं आपली जात व आपला धर्म यांचें संरक्षण करण्यासाठी बादशहाशीं लढण्यास सिद्ध व्हा.

स. १६९०

पृ. ७४ ] आमचा ब्राह्मण वकील जिंजीस गेला होता तो १ जानेवारीस पांदिचरी येथें परत आला. त्याजबरोबर राजारामाचीं व प्रल्हादपंतांचीं पत्रें आम्हांस आलीं आहेत कीं आम्ही पांदिचरीस जें तटबंदीचें काम चालविलें आहे तें एकदम बंद करावें. यासाठीं राजारामाचा एक वकीलहि येथें आला आहे.

पृ. ७५ ] जाने. १६९०. जिंजीस जाऊन आलेला आमचा ब्राह्मण वकील कळवितो, जिंजीस उघड लूट चाललेली आहे. लष्करास पगार नाहीं व लष्करी लोक दुकानांत व कोठारांत शिरून वाटेल तो माल घेऊन जातात; धनिकांकडून जबरदस्तीनें पैका उकळतात : शत्रुमुलुखाप्रमाणें आपल्या मुलुखाची नासधूळ चालली आहे.

पृ. ७७ ] जानेवारी अखेर. लक्ष्मीनायक बंदर (?) यानें बादशहाविरुद्ध पुकारा करून तीन हजार स्वार व सहा हजार पायदळ घेऊन जिंजीस प्रयाण केलें. राजारामाचे भेटीस आला. पण यांत कांहीं तरी बादशहाचा कावा आहे असा संशय येऊन ब्राह्मण कारभाऱ्यांच्या सल्लयानें राजारामानें लक्ष्मीनायकाची भेट घेतली नाहीं.

पृ. ८४ ] फेब्रु. मार्च (?) लक्ष्मीनायक आठ दहा दिवस जिंजीबाहेर तळ देऊन होता. दरम्यान त्याचें राजारामाशीं संगनमत झालें. आपण दोघे एकधर्मी, समान शत्रूशीं लढलें पाहिजे. उभयतांच्या गांठीभेटी झाल्या. लक्ष्मीनायकाचा लष्करी संच मराठी फौजांस मिळाला. मिळून बारापंधरा हजार स्वार जमला आहे, त्यांत बरेचसे बंदुकवाले आहेत. हा सर्व जमाव हाताशीं घेऊन लक्ष्मीनायक कर्नाटकांत संचार करीत आहे. बाहेरच्या कित्येक ठाण्यांत मोगली लष्कर होतें तें आपलीं ठाणीं सोडून निघून गेलें. कांहींनीं मद्रासला जाऊन आश्रय घेतला आहे.

पृ. ८५ ] मार्च १६९०. राजारामाची इच्छा दिसते कीं जिंजींतून बाहेर निघून समुद्र किनाऱ्याच्या भागांत फिरावें आणि किनाऱ्यावरील तीन युरोपियन राष्ट्रांच्या वखारींतून पैसा जमवावा.

पृ. ८९ ] मे १६९०. बंदर लक्ष्मीनायक आपली हिंदु फौज घेऊन कर्नाटकांतून ८-१० मजला मोगलांवर चालून गेला; लढाई होऊन पराभव पावला आणि एका गढींत आश्रयार्थ जाऊन बसला. त्याला मुस्लीम स्वार सामील झाले होते ते सोडून गेले. त्याचेहि पुष्कळसे लोक निघून गेले. तेव्हां त्यानें जिंजीच्या मराठ्यांकडे द्रव्यसाह्य मागितलें. पण जिंजी येथेंच पैशाची व लष्कराची धांदल उडाली होती म्हणून नायकाला येथून काय मिळणार!

पृ. ९७ ] जून १६९०. डच व्यापाऱ्यांनीं जिंजीस राजारामाकडे सटपट करून पांडिचरी काबीज करण्याचा उद्योग चालविला; पण मार्टिनचा वकील जिंजीस होता त्यानें युक्तीनें हा प्रयत्न हाणून पाडिला. याच महिन्यांत जिंजीच्या कारभाऱ्यांनीं पंनास साठ विद्वान ब्राह्मणांकडून यशःप्राप्तीसाठीं यज्ञ चालविला आहे. बादशहाला मरण यावें हा त्या यज्ञाचा हेतु. दोन तीन आठवडे हें यज्ञकृत्य चालू होतें.

पृ. १०० ] जुलई १६९०. राजाराम समुद्र किनाऱ्याच्या पाहणीला गेला. तेवनापट्टनला तो आल्याची बातमी ६ तारखेस आली. येथें डच अधिकाऱ्यांनीं त्याला दोन हजार पागोडा नजराणा दिला. नंतर राजाराम पोर्टोनोव्होला गेला, तेथें अनेक पोर्तुगीस व्यापाऱ्यांनीं त्याला भेटीची दक्षणा म्हणजे प्रत्येकानें चारशें *चक्रं, किंवा दीडशें दोनशें अशा रकमा दिल्या.

पृ. १०१ ] जिंजीच्या कारभारास पैशाची बिकट स्थिति उत्पन्न झाली असून लष्कराला पगार नाहीं; लोक भराभर सोडून चालले. कारभारी म्हणतात तेवनापट्टण प

* सेनापती दाभाडे दप्तर भा. १ प्रस्तावना पहा.—सं०

त्यासभोंवारचा तोफेच्या टप्प्याचा प्रदेश फ्रेंचांना विकून ५० हजार पागोडाचा ऐवज उभा करावा.

पृ. ११३ ] ऑगस्ट स. १६९०. मोगल फौजांनीं लछमी नायकाचा पराभव केला, तेव्हां तो लांब मजला करून पळून गेला. ही बातमी ऐकून जिंजीच्या मराठी सरकारचा घबराट उडाला. जिंजींतील लोक बाहेर पळून जाऊं लागले. खुद्द राजाराम जिंजी सोडून जाण्याचा बेत करतो. पण ब्राह्मण प्रधान त्यास विरोध करतात. " तुम्ही जिंजी सोडून जाल तर मग सगळाच घात झाला असें होईल " हें त्यांचें म्हणणें!

पृ. ११९ ] संप्टें. १६९०. उरलीसुरली हिंदू फौज जिंजीच्या आश्रयाला आली तेव्हां चहूंकडे मोठा हाहाकार उडाला. मोगल फौजाहि मराठ्यांच्या पाठलागावर धावून आल्या. त्यांनीं लगोलग जिंजीला वेढा घातला. चंदर लछमीनायकानें जीं कित्येक ठाणीं हस्तगत केलीं होतीं तीं भराभर मोगलाचे कबजांत गेलीं. या धुमाकुळामुळें मैदानी प्रदेशाचे रहीश बचावासाठीं सैरावैरा पळूं लागले किंवा युरोपियनांचा आश्रय घेऊं लागले. पुष्कळ ब्राह्मण पांडिचरीस येऊन फ्रेंचांचा आश्रय मागत आहेत. ते म्हणतात हे आम्हांस गुलाम म्हणून पकडून विक्रय करतील.

पृ. १२० ] चोऱ्या दरोडे बोकाळले आहेत. त्यांतच मराठे सामील होऊन लुटालूट करीत आहेत. रामराजा व त्याचे प्रधान यांनीं तंजावरच्या राजाकडे सख्य जोडून मदतीची याचना चालविली आहे. मदुरा-म्हैसूरच्या संस्थानांकडेहि त्यांचा हाच प्रयत्न चालला आहे. जिंजी लढविण्याचा त्यांचा उद्योग चालू झाला. परंतु आपसांतल्या हेवादाव्यामुळें सर्व मराठ्यांचें ऐक्य बनत नाहीं. त्यांच्या कांहीं सरदारांनीं मोगल सेनापतीस द्रव्य व नजराणा दिला आहे. एका तंजावरकरानें मात्र फौज, सामान, पैसा राजाराम महाराजांस पुरविला.

पृ. १२५ ऑक्टो० १६९०. मोगलफौजा जिंजीवर आल्या आहेत. बारा पंधरा हजार उत्कृष्ट स्वार, तसेंच बारा पंधरा हजार राजपूत बर्कंदाज, लुटारू पेंढारींची एक चांगली पलटण [ पृ. १२६ ] अशी ही सर्व फौज असून त्यांचा मुख्य सेनापति झुल्फिकारखान आहे. पेंढाऱ्यांना नियमित पगार मिळत नाहीं. लुटीच्या संधीस्तव ते मोगल फौजेच्या आघाडीस राहतात. या मोगलांशीं लढणारी हिंदु फौज जिंजीचें मैदान रोखून बसली आहे. मोगलांकडील सामान व चरणारीं जनावरें हे मराठे लुटून घेतात. त्यांच्यांतच तंजावर महाराजांची दोन हजार फौज सामील झाली आहे.

पृ. १२७ ] उभय बाजूंची तोफांची मारागिरी जिंजीवर चालू झाली असून, त्यांचे आवाज पांडिचरी येथें मोजतां येतात.

पृ. १२९ ] ऑक्टो० १६९०. उभय पक्षांच्या लुटारू पेंढाऱ्यांच्या टोळ्या पांडिचरीच्या आसमंतांत वावरत आहेत. मुस्लीम पक्षाच्या लुटारूंनीं आपला संचय व्हिलेनौर येथें जमविला आहे.

पृ. १४३ ] फेब्रु० १६९१ या मास अखेर राजाराम जिंजीस परत गेला.

पृ. १४५ ] मार्च १६९१ झुल्फिकारखानाचे मदतीस महाराष्ट्रांतून आणखी फौज पंधराशें स्वार, दोन हजार राजपूत, युद्धसामुग्री व पैसा आला आहे.

पृ. १५० ] मे १६९१. जिंजीला मोगलांचा वेढा पडला आहे. उभय फौजांची मारामारी चालते. दररोज उभयतांच्या लहान मोठ्या लढाया होतात. मोगल स्वारांना छावणीच्या बाहेर आठ लीग ( २४ मैल ) पावेतों चारणीसाठीं जावें लागतें. आमचीं गुरें पकडण्यासाठीं ते पांडिचरीच्या जवळ चार दोन मैलांवर आले.

पृ. १५१ ] मे १६९१. जिंजीवरील मराठी फौजांत कलह लागला आहे. मुख्य प्रधान व ब्राह्मण कारभारी खाण्यापिण्याची मजा करून राहतात, पण फौजांना पोटास न मिळाल्यानें उपास पडतात. यामुळें उभयतांत मोठी तेढ उत्पन्न झाली आहे. [ कित्येक सरदार धन्यास सोडून चालले ? ] यास्तव रामराजानें दोन तीन प्रधान कारभाऱ्यांस नोकरींतून बडतर्फ केलें. पण या कारभाऱ्यांच्या मदतीशिवाय कामें कशीं निभावणार ! प्रधानांना खात्री वाटते कीं आपल्याशिवाय कारभार नीट चालणार नाहीं.

पृ. १५५ ] जून १६९१. या महिन्यांत मोगल मराठ्यांचे दोन तीन संग्राम चांगले बनून आले. त्यांत उभय पक्षाचे बरेच लोक पडले. मोगल फौजांस मदतीचा व साहित्याचा पुरवठा चांगला होतो.

पृ. १५९ ] जुलई. तंजावरचा महाराज जिंजीकरांस पैशाची मदत देत नाहीं. राजारामाचे वकील तंजावरास जाऊन पैसा मागत आहेत. ते म्हणतात, सर्व हिंदूंनीं एकदिलानें धर्मरक्षण केलें पाहिजे. पुष्कळ वाटाघाट होऊन शेवटीं तंजावरकरानें पैसा व फौज राजजावर पाठविण्याचें मान्य केलें.

पृ. १६९ ] नोव्हें० १६९१. सुलतान कामबक्ष मोगल फौजेंत येऊन दाखल होणार, तेणें करून प्रांतांत चहूंकडे चिंता उत्पन्न झाली आहे. दक्षिणचे हिंदु सत्ताधीश व जमीनदार हवालदील होताहेत.

झुल्फिकारखानानें राजारामास लिहून कळविलें, वेलोर तुम्ही आपल्याकडे ठेवून जिंजी माझ्या हवालीं करा. एकदां कामबक्ष दाखल झाल्यावर मग मात्र हातीं सत्ता राहणार नाहीं. राजारामानें आपल्या कारभाऱ्यांशीं याची वाटाघाट केली आणि जिंजी लढविण्याचा निश्चय केला. ( पृ. १७० ) तंजावर महाराजाकडून मोठी फौज येण्याची त्यांना आशा आहे. बिन लढाऊ माणसांना राजारामानें जिंजींतून बाहेर काढून दिलें, आणि किल्ला लढविण्याची सिद्धता केली. झुल्फिकारखानाशीं राजारामाचें अंतःगुप्त बनलें आहे. म्हणून जिंजी किल्ला काबीज करण्याची खानाची इच्छा नाहीं.

जोराचा पावसाळा चालू होऊन जिंजीच्या आसमंताचे तलाव सर्व तुडुंब भरले. मोगल छावणीजवळचा एक मोठा तलाव फुटून नाश झाला. त्यांत माणसें, जनावरें, गाडे, तंबू, धान्यसामुग्री पुष्कळ गमावली.

पृ. १७५ ] डिसेंबर १६९१. तंजावरकरानें मोठी रकम राजारामाकडे पाठविली, त्याजमुळें जिंजीचा बचाव राजाराम करीत आहे.

पृ. १७९ ] जानेवारी १६९२. व्हिलेनूर मोगलांचे कबजांत होतें, त्याजवर कृष्णा अंताजीनें चढाई करून मोगलांस घालवून ठाणें काबीज केलें; [ पृ. १८० ] ७ जानेवारी.

पृ. १८१ ] पांडिचरीच्या पश्चिमेकडील एका गांवांत मराठ्यांच्या शत्रुपक्षांतील एक ब्राह्मण आश्रयार्थ गेला. त्यास पांडिचरीच्या गव्हर्ननरानें आश्रय दिला. या आगळिकीबद्दल कृष्णाजी अनंतानें पांडिचरीवर फौजेनिशीं चाल केली. त्यास पुष्कळ रकम देऊन गव्हर्नरानें परत पाठविलें. पैसा घेऊन कृष्णाजी अनंत परत गेला.

पृ. १८३ ] जाने० १६९२. सुलतान कामबक्ष व आसदखान मुख्य प्रधान मोगल फौजांत येऊन दाखल झाल्याची बातमी आली आहे. जिंजीचा वेढा कसोसीनें चालवून तें स्थल त्वरेनें हस्तगत करण्याची निकड यांनीं चालविली आहे.

याबरोबरच जिंजीच्या साह्यार्थ दक्षिणेंतून नवीन मराठी फौजा त्वरेनें येत आहेत. दक्षिणेंतसुद्धां बादशहानें काबीज केलेलीं मराठ्यांचीं ठाणीं ते भराभर परत जिंकून घेत असल्याचीहि बातमी आहे. या बातमीनें जिंजींतील मराठ्यांना नवीन हुरूप चढला आहे. त्यांनीं मोगलांच्या लष्करावर दोनतीन छापे घातले. एकदां तर त्यांना चांगलाच जय मिळाला. पुष्कळसे घोडे, एक हत्ती व जनावरें काबीज केलीं. झुल्फिकारखान मराठ्यांना अनुकूल असल्याची दाट बोलवा ऐकूं येते.

पृ. १९१ ] फेब्रुवारी १६९२. कामबक्ष फौजांत दाखल झाल्यानें मोगलांचा वेढा कडक बनला आहे. नवीन मोर्चे बसविण्यासाठीं त्यांनीं मातीचीं पोतीं असंख्य तयार केलीं आहेत.

पृ. १९३ ] १ मार्च रोजीं मराठ्यांची व मोगलांची एक चकमक पांडिचरीजवळ उडाली. मराठे धान्य विकत घ्यायला आले होते. आज वीसपंचवीस दिवस हा झगडा आमचे शेजारीं चालू आहे.

पृ. १९८ ] मार्च १६९२. झुल्फिकारखान तीन हजार स्वार घेऊन मुलखांत लूट करीत होता, त्यानें पुष्कळसे जनावरांचे कळप पकडून आणले. मुलें, बायका, पुरुष असे सात आठ हजार इसम त्यानें पकडून आणले असून त्यांची विक्री चालू आहे. झुल्फिकारखान बाहेर गेल्याची ही संधि मराठ्यांचे पथ्यावर पडली. त्यांनीं लगेच मोगलांचे घोडे, दारूसामान अशी पुष्कळशी सामग्री पकडून घेतली. दोनही पक्षांच्या तोफा सारख्या चालू आहेत, पण फारसा परिणाम त्यामुळें घडून येत नाहीं.

पृ. २०० ] एप्रिल १६९२; मराठे-मोगलांच्या झटापटी सुरू.

पृ. २०४ ] एप्रिल. जिंजीच्या दक्षिण बाजूनें मोगलांनीं किल्ल्यावर जोराचा मारा चालविला आहे. त्या बाजूनें मराठ्यांस जाणारी रसद बंद करण्याकरितां निवडक

फौजांचा तांडा बसला आहे. पण राजारामाशीं खानाचें सूत असल्यामुळें रात्रीच्या समयीं किल्ल्यांत खुशाल सामान जातें.

पृ. २०५ ] मे १६९२. चकमकी, लूट, जाळपोळ चालू. पुलिकत पावेतों हा मुलख उडाला आहे. सर्वस्वाचा विध्वंस होत आहे.

पृ. २१४ ] हाच प्रकार जून १६९२ तहि चालू.

पृ. २२३ ] जुलई १६९२. हाच प्रकार पांडिचरीजवळ मोगलांनीं चालविला आहे.

पृ. २३१ ] मराठ्यांस पश्चिम बाजूनें खडकांतून व जंगलांतून रसद भरपूर मिळण्याची सोय असल्यानें वेढ्याचा परिणाम घडत नाहीं (जुलई १६९२). मोगलांनीं वारंवार हल्ले चढविले. एका बुरजांत खिंडार पडलें त्यांतून मोगलांनीं प्रवेश करून जम बसविला, परंतु तो सफल झाला नाहीं. त्यांचे पुष्कळ लोक जायां होऊन त्यांस माघार घ्यावी लागली.

पृ. २४४ ] सप्टें० १६९२. या महिन्यांत मराठ्यांनीं दोनदां मोगलांवर हल्ला चढवून यश मिळविलें; एक तीन हजारी मोगलांचा उमराव व पुष्कळसे लोक जायां झाले. त्या उमरावाचा चांदीचा नगारखाना व पांच हजार बैल सामुग्री लादलेले होते. त्यांपैकीं ३ हजार मराठ्यांचे हातीं पडले. पुष्कळसें सामान व पैसा मराठ्यांनीं बाहेरच्या जिंजींतल्या लोकांस पोंचविला.

पृ. २५० ] ऑक्टोबर १६९२. मोगलांच्या फौजा जिंजीच्या तटापावेतों पोंचल्या असून त्यांचे हल्ले चालू आहेत. मराठे शौर्यानें तोंड देत आहेत. त्यांना बाहेरून भरपूर सामुग्री पोंचत आहे.

पृ. २५५ ] नोव्हें० १६९२. जिंजीच्या छावणींतून आलेली बातमी, मोगलांचे हल्ले जिंजीवर चालू आहेत, पण किल्ला त्यांचे हातीं पडण्याचें लक्षण दिसत नाहीं. दक्षिणेंतून जिंजीच्या बचावास भराभर फौजा येत असल्याची बातमी आहे. मोगलांच्या लष्करावर आंतील मराठे छापे घालतात, ते यशस्वी होतात. राजाराम व झुल्फिकारखान यांचें अंतस्थ सूत आहे असा जो बाहेर बोभाटा चालतो त्यास पोषक अशाच गोष्टी दिसून येतात. झुल्फिकारखानाचे वकील खुशाल राजारामाकडे जातयेत असतात. उभयतांच्या वाटाघाटी चालतात. या वाटाघाटी कांहीं गुप्त कांहीं राजरोस घडत आहेत.

बादशहाकडून झुल्फिकारखानास वारंवार ताकिदी व ठपके येत आहेत. तुम्ही तावडतोब जिंजीचा किल्ला काबीज न कराल तर तुमच्या तंबूंचे तणावे कापून तुम्हांस उघड्या मैदानांत बसवूं अशा धमक्या बादशहा खानास देतो.

पृ. २६७ ] डिसें० १६९२. २२ तारखेस जिंजींतून बातमी आली कीं धनाजी जाधव सातआठ हजार स्वारांसह दाखल झाला असून त्याचा मोगलांशीं पश्चिम द्वाराजवळ मुकाबला होत आहे. पश्चिम दरवाज्यापुढें मोगलांचे खंदक असून, त्यांजवर इस्माईलखान मका याची नेमणूक आहे. हा उमराव निकरानें मराठ्यांना अटकाव करीत

असून तो धान्यसामुग्री किल्ल्यांत जाऊं देत नाहीं. इस्माईलखानाशीं सामना केल्याशिवाय किल्ल्यांत रसद पोंचत नाहीं असें पाहून धनाजीनें त्याजवर समोर हल्ला चढविला; मोगलांचे खंदक काबिज केले. पुष्कळसे उभय पक्षांचे लोक जाया झाले. इस्माईलखानास जखमा लागून त्यास धनाजीनें पकडलें. अशा रीतीनें रस्ता मोकळा होतांच मराठ्यांचा किल्ल्यांत प्रवेश होऊन त्यांनीं पुष्कळशी लूट आंत पोंचविली. दोन हत्ती, पांचशें घोडे, सामान व कैदी मोगलांचे मराठ्यांनीं पकडून घेतले.

झुल्फिकारखानानें कामबक्षास पकडून कैदेंत घातले. कामबक्षानें राजारामास लिहिलेलीं पत्रें खानानें पकडलीं. आम्ही तुमचे साह्यास येतो, तुम्हीं घाबरूं नये, असा मजकूर पत्रांत होता, हाच गुन्हा कामबक्षाचे पदरांत घालून त्यास खानानें अटक केली.

पृ. २६८ ] औरंगजेब मरण पावल्याची बातमी छावणींत पसरली आहे. ( मार्टिननें हा प्रकार स. १६९६ त लिहिलेला आहे ). ता. २८ ( डिसें. १ ) ला बातमी आली कीं, धनाजीनें आणलेली नवीन फौज दोन तीन दिवस किल्ल्यांत राहिली. नंतर त्यांनीं एकदम मोगलांच्या तोफांवर चालून घेतलें. उभयतांचा निकराचा संग्राम झाला. मराठ्यांनीं मोगलांच्या १४ पितळी तोफा काबीज केल्या. शिवाय दोन हत्ती व समस्त दारूगोळा मराठ्यांनीं हस्तगत केला. ही सर्व लूट मराठ्यांनीं किल्ल्यांत नेली.

मोगलांकडे येणारी रसद व युद्धसामग्री व्यवस्थित पोंचविण्याचे कामावर अली मर्दानखान याची नेमणूक जिंजीबाहेरच्या मैदानांत होती. या महिन्यांत खान पुष्कळसें सामान मोगलांसाठीं आणीत असतां, त्याची पाळत संताजी घोरपडे यानें राखून त्यानें एकदम अलीमर्दानखानावर छापा घातला. संताजी त्यावेळीं दक्षिणेंतून दहाबारा हजार स्वारांनिशीं जिंजीचे साह्यास धावून येत होता. अलीमर्दानखान पुष्कळ सामुग्री मोगलांकडे घेऊन जात आहे ही बातमी संताजीस मिळतांच, त्या हिकमती पुरुषानें युद्धाचे डावपेच पूर्ण ओळखून आणि मोगलांच्या हालचालींची बातमी पक्की मिळवून त्यांच्या वाटा रोखून धरल्या. समग्र क्षेत्राची रचना पूर्ण लक्षांत घेऊन मोगलांस कोठें कसें अडकवतां येईल याची सूक्ष्म कल्पना त्यानें बरोबर ठरविली आणि मोगल आपल्या आटोक्यांत आले अशी खात्री होतांच त्यानें आपला एक लष्करी भाग हूल दाखविण्यासाठीं मागें फिरविला आणि जवळ फक्त दोनतीन हजार स्वार घेऊन अलिमर्दानखानाशीं सामन्यास आला. खानाला वाटलें, आपल्या दुप्पट तिप्पट लोकांना आपण सहज नरम करूं, अशा भावनेंत खान संताजीवर चालून गेला, संताजीनें घेतल्याचा देखावा केला; आणि मोगलांना अशा बिकट जागीं आणिलें कीं त्याची तुकडी एकदम पुढें चालून आली, त्यांनीं खानास लगेच पूर्णपणें वेढून घेतलें. तास पोवेतों हातघाईचा संग्राम दोघांचा झाला. संताजीचे लोक ... असतां खानाचा पाडाव झाला. तो स्वतः, त्याचे पुष्कळसे सरदार, ... खानाच्या आश्रयानें मुद्दाम माल घेऊन चालले होते ते सर्व, शिवाय पांच ...

घोडे, मोगलांचा समस्त अजबाब, त्यांचें सर्व कांहीं वित्त व सामान व जनावरें सर्व मराठ्यांचे हातांत पडून ही सर्व लूट संताजीनें खुशाल जिंजीच्या किल्ल्यांत पोंचविली. मोगलांकडून कांहीं अटकाव झाला नाहीं.

हे नवीन आलेले घोडेस्वार, पूर्वी आलेले दोनतीन हजार आणि एकंदर वेढ्यांत सांपडलेले पहिले लोक मिळून एकंदर मराठ्यांची फौज आतां तीस हजार तरी झाली आहे. मोगलांना आतां विशेष धोका उत्पन्न झाला आहे, त्यांनाच वेढा पडला असून बचावाची पंचाईत वाटत आहे. धान्य, सर्पण, जनावरांचा चारा या सर्वांची टंचाई मोगलांना तीव्र भासत आहे. त्यांना माघार घेण्याचीहि सोय उरलेली नाहीं. मराठे त्यांना तेव्हांच ग्रासून टाकतील असा प्रसंग आहे.

पृ. २७१ ] डिसें० १६९२. मराठ्यांची एकंदर खडी फौज दीडलक्ष स्वार असावी. भाले, तलवारी हीं त्यांचीं हल्ला करण्याचीं हत्यारें, ढाल हें बचावाचें साधन. कांहींच्या जवळ धनुष्यबाण आहेत, पण ते अगदीं थोडे. या बाबतींत मोगलांची सरशी मराठ्यांवर सहज आहे. मोगलांचा बंदुकांचा नेम मराठ्यांहून सरस असून त्यांचे धनुष्यबाणहि जास्त मारक आहेत, त्यामुळें मोगलांपुढें जाण्याची मराठ्यांना छाती होत नाहीं. मोगलांचा लढाऊ बाणा मराठ्यांना वरचढ वाटतो. तीन चार हजार मराठे स्वारांपुढें एक हजार मोगल कधीं हटणार नाहींत. गुप्त छापे घालण्यांत मात्र मराठे चांगले पटाईत, म्हणूनच त्यांस यश मिळतें. तहानभूक श्रम सोसण्यांत ते मोगलांना भारी, त्यांचें सामान हलकें, खाणें थोडें पुरतें.

पृ. २७७ ] जाने० १६९३. उपासमारीमुळें मोगलांनीं जिंजीचा वेढा उठविला आहे. धान्यसामुग्री मिळविण्याकरितां या महिन्यांत झुल्फिकारखानानें तीन प्रयत्न केले. लोकांच्या घरावरील गवत काढून आपल्या जनावरांस खाणें पुरविलें. परंतु दोन प्रयत्न सफशेल फसले. गेलेल्या मार्गानेंच परत येणें त्यास भाग पडलें. दोनही पक्षांना नफा-नुकसानी सारखीच भोंवली. स्वतः झुल्फिकारखान समोर दिसला कीं त्याजवर चाल करण्याची मराठ्यांना छाती होत नाहीं. मराठ्यांहून खानाची लष्करी शिस्त वरचढ आहे. खानाच्या बंदुका व पिछाडी पाहून मराठ्यांना त्याजवर चाल करवत नाहीं.

झुल्फिकारखानाचा तिसरा प्रयत्न वांदिवाशकडे झाला, त्यांत धान्यानें भरलेलीं कित्येक हजार जनावरें त्यानें पैदा करून आणिलीं. खानाच्या बंदुकांचा मारा मराठ्यांना सहन झाला नाहीं. अडचणीच्या वाटेनें चाललेलीं कांहीं थोडीं जनावरें मात्र मराठ्यांचे हातीं पडलीं.

पृ. २७८ ] झुल्फिकार व आसदखान यांनीं आपले वकील राजारामाकडे पाठविले असून आम्हांस बिनविरोध परत जाऊं द्या, अशी मागणी केली आहे. राजारामानें या वकिलांचा सत्कार केला नाहीं. संताजी आल्यावर जबाब देऊं असें उत्तर कळविलें.

जिंजीच्या मोगलाच्या मदतीत दक्षिणेंतून आणखी फौज येत आहे तिला अडविण्यास संताजी गेलेला आहे. असा हा बनाव जानेवारीचा होय.

पृ. २८० ] जाने० १६९३. जिंजीचा दुय्यम प्रधान कृष्णा अंताजी हा मराठी दरबारांत आमचा दुष्मन बनला आहे. त्याचा हा राग आमचेवर होण्याचें कारण आम्ही त्याला भेटीस बोलावलें नाहीं कीं त्यास येथें नजीक आला तेव्हां आम्हीं कांहीं नजराणा पाठविला नाहीं. मोगलांनींच त्याला येथून घालवून दिलें. त्याला खूप करण्याकरितां आम्ही आतां २ बंगाली चिटाचीं ठाणें, व ३½ अवनी (= यार्ड) कापड त्याच्या घरांतील लग्नप्रसंगानें पाठविलीं आहेत.

पृ. २८४ ] फेब्रु० १६९३. कृष्णा अनंताचे मार्फत राजारामानें आमच्याकडे पैशाचा तगादा चालविला, पांडिचरी आमची, तुम्हीं पैसा भरून विकत घ्या अशी मागणी आली. कृष्णा अनंत हा दरबारांतला तिसरा प्रमुख, म्हणन त्यास २०० +पागोडा रोख व चाळीस पंनास पागोडा किंमतीचें कापड नजर करून आम्ही त्याची मर्जी प्रसन्न करून घेतली. त्याचप्रमाणें आनंदराव मुजुमदार यास १०० पागोडा दिले. आतां ते खुप झाले आहेत.

पृ. २८५ ] फेब्रु० १६९३. जिंजीपुढें मोगलांचा निभाव लागत नाहीं. झुल्फिकार-खानानें राजारामास एक लाख रुपये भरून बिनविरोध परत जाऊं देण्याची परवानगी मिळविली. शिवाय ६० हजार पागोडा किंमतीचें जवाहीर खानानें राजारामास दिलें. उलट राजारामानें खानास पंधरा हजार पागोडांचें जवाहीर, एक हत्ती, दोन घोडे, पुष्कळशीं उंटें आणि दोन हजार बैल सामानाकरितां असा नजराणा देऊन खानास निरोप दिला.

पृ. २८६ ] ३ फेब्रु० १६९३. रोजीं मोगल जिंजीचा वेढा उठवून निघाले. त्यांस पोंचविण्यास मराठ्यांनीं आपला पहारा दिला. मोगलांनीं सामानसुमान सर्व छावणींत तसेंच ठेवून दिलें, बरोबर नेलें नाहीं. सामान वाहून नेण्यास जनावरें मिळेनात. मग तें सर्व सामान मराठ्यांनींच लुटून घेतलें. मोगलांच्या पिछाडीचे दोनतीन हजार लोक वांदिवाशला जाऊं शकले नाहींत तेही मराठ्यांनीं पकडून घेतले. वांदिवाश जिंजीपासून १०–१२ लीगवर आहे. उभयतांत युद्धसंग्राम थांबविण्याचा करार झाला आहे.

राजाराम व खान यांचा हा प्रकार बाहेर मराठा सेनानींना कळला, तेव्हां ते राजारामावर अत्यंत रुष्ट झाले. आपणांस विचारल्याशिवाय फक्त एका प्रधानाच्या सल्ल्यानें परभारें यांनीं युद्धतहकुबीचा करार कां करावा, आम्ही युद्धें लढतों तर आम्हांस एका शब्दानें तरी त्यांनीं विचारावें कीं नाहीं, कामबक्ष हातीं सांपडला त्यास यांनीं कबजांत ठेवून दंड मागावा कीं नाहीं ! प्रधानांनीं लांच खाऊन आपले खिसे भरावे आणि आम्ही मात्र लढून मरावें !

---

+मोहोरा ?

पृ. २८७ ] संताजी घोरपडे रुसून जिंजीहून कांहीं कोस बाहेर जाऊन बसला आहे.

( मार्टिन लिहितो ), आम्हांस वाटतें झुल्फिकारखानास जिंजी तावडतोब घेण्याचें सामर्थ्य होतें, पण तसा निकर त्यानें न करितां वेढा लांबणीवर चालविला हा उपकार स्मरून राजारामानें त्यास युद्धतहकुबीची सवलत मुद्दाम दिली.

पृ. २८७ ] राजारामानें संताजीची समजूत घालून त्याचा रुसवा घालविला. संताजीस त्यानें कळविलें, झुल्फिकारखानाचा व माझा गुप्त करार झाला आहे कीं बादशहा आतां फार दिवस वांचत नाहीं. त्याचे पश्चात् गोवळकोंड्याचा प्रदेश झुल्फिकारखानानें घ्यावा व विजापुरचा राजारामानें घ्यावा. संताजीस भेटून व त्यास बक्षीस देऊन राजारामानें त्याचा संतोष केला.

पृ. २८८ ] अशा प्रकारें अठ्ठावीस महिने चाललेला जिंजीचा संग्राम संपला ( फेब्रु० १६९३ ).

पृ. ३०३ ] मार्च १६९३. मराठे सरदार जिंजी सोडून गेले. परत दक्षिणेंत जातांना त्यांनीं वाटेंतील प्रदेश लुटून फस्त केला. लछमन नायक वगैरे मराठ्यांचे सहायकहि जिंजी सोडून गेले. हल्लीं जिंजी येथें राजारामाजवळ फक्त १५०० लोक आहेत.

पृ. ३३३ ] सेप्टें० १६९३. डच लोकांनीं पांडिचेरी काबीज करून फ्रेंचांस तेथून काढून दिलें. मार्टिन यास कैद करून त्याची रवानगी त्यांनीं बटेव्हियास केली.

पृ. ३९१ ] तेथून तो पुढें परत बंगाल्यांत चंद्रनगरास ता० ९ फेब्रुवारी सन. १६९४ रोजीं आला.

मार्टिनच्या या रोजनिशीचा शेवट पृ. ३९३ वर ता० १५ फेब्रुवारी स. १६९४ ला झाल्याचा उल्लेख आहे. ही फ्रेंच भाषेची रोजनिशी इ. स. १९३४ त छापून प्रसिद्ध झाली. त्यांतील मराठ्यांसंबंधाच्या मजकुराचें इंग्रजी भाषांतर सर जदुनाथ सरकार यांनीं करून दिलें त्यावरून हें मराठी अवतरण बनविलें आहे. सेप्टेंबर सन १६९७ त रिस्विकचा तह होऊन डच-फ्रेंचांचें युद्ध संपलें; आणि पुढें स. १६९९ च्या मार्चांत मार्टिन पुनः पांडिचरी येथें अधिकारावर आला. स. १६९४ त झुल्फिकारखान तंजावरावर चालून गेला. स. १६९६ त राजारामाचे मदतीस महाराष्ट्रांतून दहा हजार स्वार आणखी आले, तेव्हां मोगल लष्कर व्हालडोरला निघून गेलें. स. १६९७ त पुनः झुल्फिकारखानानें मराठ्यांवर चढाई केली, पण राजारामाचें व त्याचें संगनमत होऊन राजाराम परत स्वदेशीं पोंचला.

---

## ऐ. सं. निबंध खंड ५

# सूची

ह्या सूचींत व्यक्ति स्थलनामाबरोबर विषय निर्देशक नामेंहि कांहीं घेतलीं आहेत. अनुस्वाराची स्वतंत्र बाराखडी असून पुढें जोडाक्षरें घेतलीं आहेत.

सूची

# Gist of the Marathi Articles in this Issue

1. **Shri. B. R. Kulkarni** in 'The Lagna System of the Vedāṅga Jyotisha' says, "Anterior to certain period, the Hindu astronomy discloses no knowledge of the *Rasis.* Nakshatrās, the 27 or 28 divisions of ecliptic, are used for all purposes therein. Vedāṅga Jyotisha is an example of such work. Still there is a Lagna in the Vedāṅga Jyotisha. The nature of it can be determined by Jyotisha Karaṇḍaka verse No. 288 (2) It indicates that the Nakshatra rising on the east at the time of sunset was the Lagna for the whole day and it remained so for well over 13 days. It was always the 15th Nakshatra from the one in which the sun rose on the particular day."

---

2. **Prof. H. B. Bhide** in 'An outline of the History of Śakti-Upāsanā in India,' traces very briefly the history of Śakti-Upāsanā or Mother-cult and says that it was prevalent in all ancient civilizations, including India. Vedic culture as well as the non-Vedic (like the Indus culture) show clear signs of it. He also maintains that Śakti-Upāsanā is closely connected with Rudra-Upāsanā. He broadly divides the history of Śakti-Upāsanā into three periods, viz (1) From the Vedic times to about 500 B.C., (2) 500 B.C. to 800 A.D., (3) The post-Śaṅkara period, and maintains that during the second period, Greater India was coming into existence, where also Śakti-Upāsanā prevailed.

---

3. **Shri. N. S. Rajpurohit** in 'The Kāṇva Empire' has tried to show that the Kāṇvas were the Kāṇva brahmans and not the brahmans born in the Kāṇvāyana *Gotra.*

---

4. **Prof. V. V. Mirashi** in 'Eraṇ Pillar Inscription of Śrīdharavarman' says, "This inscription was discovered in

1951. It is incised on a small stone pillar, afterwards converted into a Śiva-liṅga, at Eraṇ in the Saugor District of Madhya Pradesha. The record is much abraded. It is dated in the twenty-seventh regnal year of the *Rajan* and *Mahakshatrapa* Śrīdharavarman, son of Śaka Nanda. Its object is twofold viz., (i) to record that one Nārāyaṇasvāmin built a *ghāṭ* on the river at Erikiṇa and (ii) to state that Satyanāga of Mahārāshṭra, the *Arakshika* and *Senapati* of Śrīdharavarman, erected a *yashṭi* (i. e. the pillar on which the inscription is incised) to commemorate a great battle fought at Erikiṇa in which several Nāga soldiers lost their lives.

The inscription shows that Śrīdharavarman was ruling as an independent king in the Vidiśā-Erikiṇa country in the fourth century A. D. It also gives the first epigraphic mention of Mahārāshṭra."

---

5. **Prof. D. V. Potdar** in '**A manuscript of Jñānadevī**', says, " Written on old paper, in a clear bold hand and in black ink this manuscript of Jñanadevī bears the date Śaka 1660, Śrāvaṇa Vadya 1, Thursday, corresponding to 20th July 1738. However the grammatical forms occuring in the Ms are older still. One notable peculiarity is that the copyist Bhaṭṭa Jīvana describes himself as a Modī (a Bania Caste) hailing from Vaṭapadra or Baroda. The copy was meant for some royal person. Ovis 9471. Name of the Ms almost everywhere given as Jñānadevī. Refers to the efforts of Ekanātha, in terms slightly different from the usual. A reference to one Rāgho Viśvanātha Rāmadāsī is worth noting. Is accompanied by another Ms Jñāneśvarī Gūḍha Bhāshā dated Śaka 1694."

---

6. **Shri. Kanole** in 'Who arranged the chapters of Amṛitānubhava?' tries to establish the fact that it was Śiva-Kalyāṇa who arranged the ten different chapters of Amṛitānubhava.

---

7. **Dr. R. G. Harshe** in 'Ghaṭachakra: an unpublished work of the Nātha Saṁpradāya' says, "*Ghatachakra* is a small treatise in Marathi prose on Rājayoga, belonging to the Nātha Saṁpradāya, and is based on a Sanskrit original of which it is supposed to be a commentary. The Ms. (No. 7937 of the Deccan College collection) bears no date; but it must be late eighteenth century. Its Marathi is as was spoken in Tanjore. It is a sort of a manual explaining the significance of the different Chakras, the presiding deities, the lights visible and the mantras to be repeated etc. and describes the spiritual path from the most elementary stage to the highest goal i. e. the realisation of Brahman. It is an important find in as much as very few prose works of the Peshwa period are available in Marathi."

---

8. In 1948 **R. S. G. V. Panse** in his paper on Mahisha-Śataka discussed the merits and demerits of the twelve different manuscripts of the poem Mahisha-Śataka which he had collected from different sources. He maintained that the manuscript found at Tanjore should be accepted as the authentic one. This contention of Shri. Panse was not accepted by Shri Pingle of Gwalior who maintains that the copy of Mahisha-Śataka which he found in the Mātṛibhūmi Kāryālaya at Gwalior, is the original one and should be accepted as the authentic one. But Sri. Panse still holds to his own conclusions and does not accept the view of Shri. Pingle.

---

9. **Shri. Y. G. Phaphe** in 'Discussion about some important historical points in Śhiva-Bhārata' lays before the reader some of his doubts, defects in the translation and incorrect readings of the text. In the course of his article he suggests some new readings (many of which happily correspond with the original MS which he did not see), improves the translation and discusses at length some historical points which, in his opinion, are not satisfactorily dealt with by the writer of the preface.

---

10. **Shri. Y. R. Gupte** in 'The Thousand Buddha Caves in China and their paintings.' tries to briefly describe the Buddha-Caves and introduces the reader to thier date, antiquity, and where-abouts.

---

11. **Shri. D. K. Deshpande** in 'The early life of the impostor of Bāpūjī Phaḍake,' gives some interesting account of the imposter of Bāpūjī Phaḍake and the treatment he received

---

12. **Shri. A. K. Vyas and Shri. G. H. Khare** :—11 letters from the *Peshwas* and their *Sardars* to the *Maharanas* of Udaipur. These contain among others the following matters. Annual tributes from the Māhārānās; thanks-giving for the help given to Rādhābāī, the mother of Bājīrāo I in her pilgrimage; Bājīrāo I's plan for the conquest of the North; congratulations for the marriage invitation of Pratāpasiṁha; wish for cordial relations between Chhatrapatis and Māhārānās; decision of the Marāthās not to support the impostor of Ratnasiṁha.

---

13. **R. B. Dr. G. S. Sardesai** in 'Some extracts from the diary of Francis Martin' gives some important information about the condition of the Marāthās at the time of the siege of Jinji, the importance of Krishṇājī Ananta in the Marāthā affairs, the pitiable condition of the Mughals, the secret understanding between Rājārāma and Zu'l-fiqārkhān and the way the French tried to safeguard their interests.

---

ऐतिहासिक संकीर्ण निबंध खंड ५

# अनुक्रमणिका




Printed by Mr. Keshav Ganesh Sharangpani at the Aryabhushan Press, House No. 915/1 Shivajinagar, Poona 4, and published by Mr. C. G. Karve, Hon. Secretary, B. I. S. Mandala, at 313A Sadashiv Peth, Poona 2, India.

# भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणें.

## —मंडळाची प्रकाशन सूची—

### गटवारी किंमत

| | | |
|---|---|---|
| १ स्वीय ग्रंथमाला–संपूर्ण सेट– | किंमत | रु. २२१–६–० |
| २ त्रैमासिक अंक वर्षं १ ते ३२ | ,, | रु. १६०–०–० |

दर ५ रु. प्रमाणें

| | | |
|---|---|---|
| ३ पुरस्कृत ग्रंथमाला–,, ,, – | ,, | रु. १४३–६–० |
| ४ शिवचरित्र ग्रंथमाला ,, – | ,, | रु. ३०–८–० |
| ५ Selections From the Bombay Records | ,, | रु. १५–०–० |
| ६ महाराष्ट्र–संतकवी ग्रंथमाला ( ॲबट कृत ) | ,, | रु. २३–१२–० |
| ७ पेशवे दप्तर ( ४६ भाग व सूची हँडबुक प्रस्तावना, मार्गदर्शिका मिळून ) | ,, | रु. १६६–५–३ |
| ८ पूना रेसिडेन्सी कॉरसपॉन्डस् | ,, | रु. ३९–४–० |
| म. म. प्रा. द. वा. पोतदार षष्ठ्यब्दी सन्मान ग्रंथ ( इंग्रजी विभाग पृष्ठें. ४००, मराठी विभाग पृष्ठें १८० ) | | रु. १६–०–० |
| मराठी रुमाल भाग १ ला ( पृष्ठें १८८ ) | | रु. ०–१२–० |
| दत्तोपंत आपटे लेखसंग्रह ( पृष्ठें २८६ ) | | रु. ५–०–० |
| दत्तोपंत आपटे स्मारक ग्रंथ ( पृष्ठें २१६ ) | | रु. ६–०–० |
| कविवर्य मोरोपंतांची संशयरत्नावली ( मूळप्रत ) | | रु. ०–४–० |
| मोडक जंत्री ( दुर्मिळ ) इ. स. १७२८ ते १८२८ | | रु. ५०–०–० |
| खरे जंत्री ,, ,, १७२७ ते १८२७ | | रु. ५–१२–० |

### वा. प्र. मोडक यांचे ग्रंथ

| | |
|---|---|
| कोल्हापूर राज्याचा इतिहास | रु. २–०–० |
| दक्षिणेंतील मुसलमानी राज्याचा इतिहास | रु. २–८–० |
| बहामनी राज्याचा इतिहास | रु. २–०–० |

### इंडियन हिस्ट्री कॉंग्रेस प्रोसिडिंग्ज

| | |
|---|---|
| इंडियन हिस्ट्री पुणे अधिवेशन, १९३५ | रु. ३–०–० |
| इंडियन हिस्ट्री कॉंग्रेस अधिवेशन अलाहाबाद, १९३८ | रु. ५–०–० |

### इतर ग्रंथ

| | |
|---|---|
| भारतवर्ष वर्ष १ लें अंक १ व ४ ते १२ | ( प्रत्येकीं १ रुपया ) |
| अधिकारयोग, खरेकृत. | रु. ०–१०–० |

सविस्तर माहितीसाठीं कचेरीकडून छापील याद्या मागवाव्यात.